# समरांगण



— लेखक —

लक्ष्मण नारायण भावे



— प्रकाशक —

केमकर आणि मंडळी मुंबई नं. ४.

प्रथमावृत्ति ] [ सन १९४४

किंमत १ रुपया

लेखकाचे आगामी वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| वसंतागमन | — | कथासंग्रह |
| मेलेलीं मनें | — | नाटक |
| खेड्यांकडे | — | कादंबरी |

वेष्टनावरील चित्र—मिसेस् सिंधू व्ही. तळपदे यांनीं काढलें आहे.

प्रकाशक—श्रीकृष्ण दामोदर कुळकर्णी, केमकर आणि मंडळी,
बुकसेलर्स, पब्लिशर्स व स्टेशनर्स, विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई नं. ४.

मुद्रक—पांडुरंग आत्माराम देशपांडे, श्रीपाद प्रिंटिंग प्रेस,
१२ सदाशिव स्ट्रीट, गिरगांव, मुंबई नं. ४.

# आघाडीवर



गेलीं वीस वर्षे लघुकथा व विविध विषयांवरील लेख या रूपानें मी किरकोळ लिखाण करीत असलों तरी नाटक लिहिण्याची कल्पना माझ्या मनांत आली नव्हती. १९४३ च्या सुरवातीला "दक्षिण–महाराष्ट्र साहित्य-पुरस्कार समिती"नें १९४३ सालचें "श्रीमंत सांगलीकर" पारितोषिक उत्कृष्ट मराठी नाटकास देण्याचें जाहीर केलें, त्यावेळीं आपणही एखादें नाटक लिहून पारितोषिकासाठीं 'समिती'कडे पाठवावें अशी कल्पना माझे मनांत आली. त्या कल्पनेचें मूर्त स्वरूप म्हणजेच प्रस्तुतचें "सम[illegible]ण" हें नाटक होय. या नाटकास वरील पारितोषिकापैकीं दुसरें समविभागित पारितोषिक मिळून ज्या हेतूनें हें नाटक लिहिलें गेलं तो हेतूही कांहीं अंशानें सफल झाला आहे.

कादंबरी, लघुकथा, काव्य, निबंध वगैरे वाङ्मयप्रकारांप्रमाणें फक्त छापून प्रसिद्ध केल्यानें नाटक या वाङ्मयप्रकाराचें कार्य संपत नाहीं याची मला जाणीव आहे. नाटक हें दृश्यकाव्य असल्यामुळें रंगभूमि हेंच त्याचें रसिकांपुढें प्रगट होण्याचें योग्य स्थान आहे. परंतु नाटक प्रयोगरूपानें रंगभूमीवर येण्यास थोडासा कालावधि लागणें अपरिहार्य असल्यामुळें व पारितोषिक मिळाल्यामुळें तें योग्य कालावधींत प्रसिद्ध होणें आवश्यक असल्यामुळें तें प्रथम छापून प्रसिद्ध करावें लागत आहे.

प्रस्तुत नाटक पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें कामीं मला मदत केल्याबद्दल श्री. ला. ना. सावंत व श्री. ज. ना. सावंत, मुखपृष्ठावरील सुंदर चित्र अल्पावधींत काढून दिल्याबद्दल मिसेस सिंधू व्ही. तळपदे, व माझ्या लेखनांत मला उत्तेजन देणारे माझे बंधु, श्री. वि. बा. कुवाडेकर, श्री. प. ल. वैद्य, श्री. स. वा. जोग, श्री. त्रिंबक के. गोखले वगैरे मित्रमंडळीचे मी मनःपूर्वक आभार मानतों. प्रकाशनाचें व छपाईचें कार्य केल्याबद्दल अनुक्रमें केमकर आणि मंडळी व श्रीपाद प्रिंटिंग प्रेस यांच्या चालकांचा मी अत्यंत आभारी आहें.

५८, डोंगरे बाग, दादर,<br>
दिनांक १–३–१९४४.

—लक्ष्मण नारायण भावे.

# समरांगण



## —१—

[ **स्थळ**—एका मध्यमवर्गीय सुखवस्तु गृहस्थाच्या ब्लॉकमधील दिवाणखाना. त्याच्या तिन्ही बाजूंच्या भिंतींना दरवाजे असून त्यांपैकीं उजवीकडील दरवाज्यांतून आंतील खोलींतील ड्रेसिंग टेबल दिसत आहे. समोरील दरवाज्यांतून स्वयंपाकघराचा कांहीं भाग व डबे असलेली एक मांडणी दिसत आहे; व डाव्या हातांच्या दरवाज्यांतून गॅलरीचा कांहीं भाग दिसत आहे. दरवाज्यांना लावलेले पडदे जाण्यायेण्याच्या सोयीसाठीं बाजूला करून बांधून ठेवलेले आहेत. डाव्या कोपऱ्यांत टेबलखुर्ची व आरामखुर्ची आणि उजवीकडील कोपऱ्यांत फोनोस्टँड आहे. तेथेंही एक दोन खुर्च्या आहेत. मध्यभागीं एक टीपॉय व भोंवती चार खुर्च्या आहेत.

पडदा उघडतो त्या वेळीं फोनोवर गाणें वाजत आहे. जवळच एक वीस-बावीस वर्षें वयाची तरुणी रेकॉर्ड्सची निवड करीत आहे. तिची वेषभूषा अद्यावत् असली, तरी तींत व्यवस्थितपणा नाहीं. मुद्रा त्रासिक.

फोनोवरील गाणें संपते. ती तरुणी हातांतील प्लेट्स् खालीं ठेवून प्लेट काढते. नंतर हाताला येईल ती प्लेट उचलून फोनोकडे जाते;—पण लगेच मागें फिरून हातांतील प्लेट इतर प्लेट्स्मध्यें ठेवते व तसें करतांना तोंडानें कांहींतरी पुटपुटते. पुन्हां एकदोन प्लेट्स् उचलते व पुन्हां तोंडानें 'जाऊं दे मरूं दे' असें मोठ्यानें पुटपुटून इतर प्लेट्स्मध्यें टाकते. नंतर आरामखुर्चीत जाऊन ती अंग टाकते व टेबलावरील पुस्तक उघडून वाचूं लागते.—पण तेंही टेबलावर आपटून समोरच्या एका तसबिरीकडे टक लावून पाहात स्तब्ध बसते.

डाव्या हाताच्या दरवाजांत एक २७—२८ वर्षे वयाचा तरुण येऊन उभा राहतो. पोशाख साधाच पण नीटनेटका. तरतरीत पण चेहरा थोडासा कष्टी.]

**शरद** : [ आपलें अस्तित्व तिला सुचविण्यासाठीं ] मंदा—

**मंदाकिनी** : [ दचकून ] कोण ? [ ओळख पटून ] शरद ! [ चटकन पुढें येते ]

**शरद** : [ पुढें येत ] हं. प्रभाकर नाहीं वाटतं घरांत ?—आणि प्रभावहिनी ?

**मंदाकिनी** : नाहीं. दोघेही घरांत नाहीत.

**शरद** : माझं तसं कांहीं काम नव्हतं. बरेंच दिवसांत भेटलों नव्हतों. म्हटलं आलोंच आहों तर यावं भेटून सगळ्यांना ! जमलंच तर येईन थोड्या वेळानं पुन्हां. प्रभाकराला अन् वहिनीला सांग मी आलों होतों म्हणून.

**मंदाकिनी** : दादा ऑफिसमधून येईतोंपर्यंत थांब ना. वहिनीही येईल इतक्यांतच. जरुरीचं काम नाहीं ना कुठं ? [ तो 'छे' म्हणतो ] मग तर थांबायला मुळींच हरकत नाहीं.

**शरद** : पाहिल्याबरोबर ओळखलंस वाटतं ? मला शंका होती तूं ओळखशील कीं नाहीं याची.

**मंदा०** : [ हिची चर्या प्रफुल्लित झालेली दिसते ] तर तर ! म्हणे ओळखशील कीं नाहीं याची शंका वाटत होती ! तुझी ओळख विसरायला तुझी माझी आगगाडींतली ओळख नव्हती.

**शरद** : दीड वर्ष उलटून गेलं तुला मी भेटल्याला. ओळख विसरायला एवढा काळ पुरेसा आहे.

**मंदा०** : दोन वर्षं होत आलीं तूं इथून गेल्याला ! होतास तरी कुठं इतक्या दिवस ?

**शरद** : एकटा जीव आणि सदाशिव. ना आईबाप ना बहीणभाऊ. माझ्या-सारखा माणूस दुसरं काय करणार ? एका औषधी कंपनीचा फिरता प्रचारक म्हणून भटकत होतों हिंदुस्थानभर. कांहींच बंध नसलेला मनुष्य म्हणजे वावडी तुटलेला पतंगच; वाऱ्याच्या जोरावर कुठंतरी भटकत जायचा.

**मंदा०** : खरंच ! चहा ठेवायला सांगायची विसरलेंच ! [ दरवाज्याकडे जात ] काकू, अहो काकू–[ शरद्‌ला उद्देशून ] अय्या ! विसरलेंच कीं ! काकू अजून आल्या नाहींत. जरा बस हं. [एक पुस्तक देत] चहा करून आणीतोंपर्यंत हें पुस्तक बस वाचीत. छान आहे.

**शरद** : नको. एकटं बसण्याचा मला अगदीं कंटाळा आला आहे. तुझी इच्छा असल्यास बोलतच बसूं.

**मंदा०** : किती औपचारिक बोलतोस रे शरद ?–जणूं काय आत्तांच तुझी-माझी ओळख झाली आहे ! लहानपणापासून तूं, मी आणि प्रभाकरदादा एके ठिकाणीं वाढलों–खेळलों; आमच्यांतलाच तूं एक आहेस असं आम्ही समजत आलों. असं असतां एवढा परकेपणा दाखवणं बरं नाहीं.

**शरद** : तुझं म्हणणं खरं आहे. तुझ्या वडिलांच्या मित्राचा मी जरी मुलगा असलों तरी माझे आईबाप मरण पावतांच, त्यांनीं मला आपल्याकडे ठेवून, तुमच्याप्रमाणं वागवलं. लहानाचा मोठा केला. त्यांच्याच जिवावर मी वकील झालों. तुझ्या आईनंही मला कधीं परकेपणा दाखवला नाहीं. [ विपण्णतेनं ] पण त्या मागल्या आठवणी आज कशाला पाहिजेत ? जुन्या काळचं वैभव आठवून आजचं दारिद्र्य कांहीं कुणाला लपवितां येणार नाहीं. पूर्वीच्या वैभवाला विसरून आज पडेल तसं वागायला माणसानं शिकलं पाहिजे. मीही तसाच प्रयत्न करून पाहतों आहें.

**मंदा०** : मग आम्हांला विसरलाच असशील ?

**शरद** : तुम्हांला विसरलों असतों तर आज इथं परत येण्याचं कांहींच कारण नव्हतं. जवळ जवळ दीड वर्षं सर्व हिंदुस्थानभर फिरलों. अनेक प्रेक्षणीय स्थळं

पाहिलीं; पण त्यांपैकीं एकाही प्रेक्षणीय स्थळानं मला मोहिनी घातली नाहीं. आपल्या प्रिय व्यक्तींना विसरणं इतकं सोपं नाहीं, हें मला समजलं.

**मंदा :** किती चांगलं झालं तूं परत आलास तें !

**शरद :** खरोखरच मी परत आलों तें चांगलं झालं असं तुला वाटतं ?

**मंदा० :** चांगलं ? आनंद झालाय तुला पाहून !

**शरद :** [आश्चर्यानें] आनंद !

**मंदा० :** [मानेला झटका देऊन] नाहीं, वाईट वाटेल !

**शरद :** रागावूं नकोस. मी आल्यामुळं तुला वाईट वाटेल असं जरी नसलं तरी आनंद होईल असं नव्हतं वाटलं मला. तुला आनंद झाला हें ऐकून किती समाधान वाटलं मला. माझं इथं येणं तुला कितपत आवडेल याची मला धास्ती वाटत होती; त्यामुळें इथं येऊन तुला भेटावं कीं नाहीं याचा मला विचारच पडला होता.–पण भेटल्यावांचून राहवेना म्हणून आलों. त्यांतच मी आलों तेव्हां तूं उदास आणि त्रासलेली दिसलीस, तेव्हां परतच जाणार होतों मी.––

**मंदा० :** चल. कांहींतरी नको बोलूंस. मी तशी दिसतें आहें वाटतं ?

**शरद :** आतां नव्हे. मी आलों त्या वेळीं तुझं मन ठिकाणावर नव्हतं. त्यांत माझं येणं म्हणजे आगींत तेलच !

**मंदा० :** पण तुझ्या येण्यानं मला आनंद होणार नाहीं असं कशावरून वाटलं तुला ?

**शरद :** नको असलेली व्यक्ति समोर दिसलेली आवडते वाटतं कुणाला ?

**मंदा० :** तूं नकोसा झालायस आम्हांला ?

**शरद :** नकोसा नसलों तरी हवासा मात्र नक्की वाटत नाहीं. तसं असतं तर–! दोन वर्षं होऊन गेलीं. याच ठिकाणीं एक घटना घडून आली. एक तरुण एका तरुणीला लग्नाची मागणी घालीत होता. त्या तरुणीवर त्या तरुणाचं अतिशय प्रेम होतं. त्या तरुणीचा अत्यंत निकटच्या सहवासाचा लाभ त्या तरुणाला दीर्घकाळ मिळाला होता. तिच्याच आईवडिलांच्या आश्रयाखालीं तो लहानाचा मोठा झाला होता. आपल्या मुलीचं लग्न त्या तरुणाशींच व्हावं अशी त्यांचीही इच्छा होती. परंतु त्या तरुणाच्या दुर्दैवानं त्यांची इच्छा तृप्त होण्या-

पूर्वीच ते परलोकवासी झाले. त्या तरुणाला अशी खात्री होती कीं, त्याच्या मागणीचं उत्तर 'हो'कारार्थीच येणार. जन्मदाते आईबाप आणि उपकारकर्ते यांच्या निधनामुळें त्या तरुणीच्या प्रेमासाठीं तो तरुण आसुसलेला होता—

( इतका वेळ ओशाळून खालीं मान घालून उभी असलेली मंदाकिनी शरदचे बोलणें सहन न होऊन एकदम उद्गारते— )

**मंदा० :** पुढली हकीकत मी सांगतं.–ती तरुणी कटोर अंतःकरणाची होती. आपल्या मृत आईवडिलांच्या इच्छा तिनं पायाखालीं तुडविल्या. त्या तरुणावर तिचं काडीइतकंही प्रेम नव्हतं. त्याचा तिनं धिःकार केला—

**शरद् :** ती तरुणी कठोर अंतःकरणाची नव्हती; कोमल मनाची होती. आणि त्या तरुणाबद्दलही तिच्या मनांत प्रेम वाटत होतं. पण त्या तरुणीला स्वतंत्र आयुष्य कंठायची इच्छा होती. चूल आणि मूल हेंच तिला आपलं आयुष्याचं कार्यक्षेत्र बनवायचं नव्हतं. म्हणून लग्नाच्या बेडींत तिला स्वतःला अडकवून घ्यायची इच्छा नव्हती.

**मंदा० :** शरद, तुला पाहून किती आनंद झाला मला,–पण असं कठोर अन् टोंचून बोलण्यासाठींच आलास कां रे ?

**शरद् :** माफ कर हं मंदा, मला. जे कधींही कुणाजवळ बोलायचं नाही असं ठरवलं होतं, तें भावनेच्या भरांत बोलून गेलों. तुझ्या दृष्टीस पडण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून हें गांव सोडून मी मुशाफीर बनलों.–पण कंपनीच्या कामाकरतां मला शेजारच्या गांवीं यावं लागलं आणि माझ्या मनावरचा ताबा सुटला. तुला एकदां पहावं–पूर्वीसारखीच आनंदी, हंसरी मंदा पहावी म्हणून इथं आलों. पण मंदा, केवढी निराशा केलीस माझी ? तुझा लाभ नाहीं तर नाहीं, पण निदान तुला सुखी झालेलं पहावं, हीही माझी इच्छा तृप्त झाली नाहीं. [एक क्षणभर कोणीही बोलत नाहीं. मंदाजवळ जाऊन] मंदा, नोकरींत खूप त्रास होतो तुला ?

**मंदा० :** बोलूनचालून नोकरीच ती. त्रास न झाला तरच नवल !

**शरद् :** मग त्रास झाला तर असं घरांतच बसून राह्यचं वाटतं ? मोकळ्या हवेंत फिरायला जावं–

**मंदा० :** रोजरोज फिरायचं तरी कुठं ?

**शरद :** कां ? फिरण्यासारखी ठिकाणं थोडी आहेत कां इथं ?

**मंदा० :** एकाद्या पिसाटासारखं एकटं फिरण्याचा कंटाळा आलाय मला !

**शरद :** एकटं कां ? तुला खूप मैत्रिणी आहेत हें माहीत आहे मला.

**मंदा० :** मैत्रिणी आतां मोकळ्या नाहींत माझ्याचबरोबर फिरायला.

**शरद :** [हंसत] अस्सं ! मग वाचीत बसावं. शिकलेल्या माणसांना वाचनाशिवाय विरंगुळा नाहीं दुसरा.

**मंदा० :** कांहीं वाचावं असं वाटतच नाहीं अलीकडे मला. काय होतंय कुणास ठाऊक !–पण पुस्तक घेतलं कीं फेकून द्यावसं वाटतं. आत्तांच पहाना. कामावरून आले. असा त्रासला होता जीव; फोनो लावून पाहयला; वाचीत बसले; पण कशांतच मन रमेना. [घड्याळांत सहाचे ठोके पडलेले ऐकूं येतात] अय्या ! सहा वाजले वाटतं !

**शरद :** अजून कसा नाहीं आला प्रभाकर ? हल्लीं त्याचं ऑफिस उशीरां सुटतं वाटतं ?

**मंदा० :** छेः त्याचं ऑफिस सुटतं पांचलाच.

**शरद :** मग यापूर्वींच तो घरीं यायला पाहिजे होता ! ऑफिस सुटल्या-बरोबर प्रथम घरीं यायची त्याची संवय आहे.

**मंदा० :** ती त्याची संवय अलीकडे मोडली आहे. ऑफीस सुटलं कीं, परस्पर फिरायलाच जातो तो.

**शरद :** कां ? प्रभावहिनी आणि मधू इथं नाहींत म्हणून कीं काय ?

**मंदा० :** इथंच आहेत ती दोघं.

**शरद :** मग इतका वेळ प्रभाकर बाहेर राहणं कधींच शक्य नाहीं.

**मंदा :** प्रभावहिनीला घरीं यायला सहा साडेसहा होतात.

**शरद :** म्हणजे, जाते तरी कुठं ती ?

**मंदा० :** नोकरी धरल्ये तिनं.

**शरद :** प्रभावहिनीनं नोकरी धरली आहे ?

**मंदा०** : हं, तुला माहीत नाहीं, शरद. वर्ष झालं असेल. बॅंकेचं दिवाळं वाजलं. आणि दादाची नोकरी सुटली. दादाला त्याच्या योग्यतेची दुसरी नोकरी लौकर कुठें मिळेना. माझ्या एकटीच्या पगारांत भागण्यासारखं नव्हतं. तेव्हां प्रभावहिनीला नोकरी धरणं भाग पडलं—

**शरद** : शाबास आहे प्रभावहिनीची !

**मंदा०** : प्रभावहिनीनं नोकरी करणं तुला आवडलं वाटतं ?

**शरद** : कां नाहीं आवडणार ? संसार हा दोघांचा असतो.–पण मला आश्चर्य वाटतं तें हें कीं, प्रभावहिनी नोकरी करायला तयार कशी झाली ?

**मंदा०** : एकदम नाहीं कबूल झाली ती.–आणि नंतरही नोकरी करणं फारच जड गेलं तिला.

**शरद** : प्रभावहिनी आपल्या संसारांत इतकी रमून गेली होती कीं, त्यांतून बाहेर पडणं तिला शक्यच नव्हतं. सुशिक्षित असून सुद्धां चूल अन् मूल हेंच तिनं आपलं कार्यक्षेत्र ठरविलं होतं. [ मिस्किलपणानें ] आतां कांहीं सुशिक्षित आणि विद्वान् स्त्रियांच्या दृष्टीनं तें चूक होतं.–

**मंदा०** : हें वाक्य बोलला नसतास तरी चाललं असतं.

**शरद** : खोटं आहे का तें ? शिवाय तें वाक्य मी अमूक एका व्यक्तीलाच उद्देशून बोललों नव्हतों.

**मंदा०** : तर तर ! मला जसं कांहीं समजतच नाहीं.

**शरद** : बरं राह्यलं. काय म्हणत होतों मी ? हं. प्रभावहिनीसारखा नमुनेदार संसार एखादीच स्त्री चालवूं शकेल.

**मंदा०** : खरं आहे तें. दादाला घरीं कांहींच पहावं लागत नसे. पगार आला कीं, पैसे तिच्या आंगावर टाकायचा तो. नोकरीशिवाय दादाला घरांत कांहीं लक्ष द्यायचें कारण पडत नसे.

**शरद** : म्हणूनच मला आश्चर्य वाटतं कीं, प्रभावहिनी नोकरीला कशी तयार झाली ?

**मंदा०** : तिची कमल नांवाची एक मैत्रीण आहे. तिनंच हें सर्व घडवून आणलं. स्वतःच्याच नोकरीच्या ठिकाणीं तिनं वहिनीला नोकरी लावून दिली.— आणि नंतरही कामांत तिला फारच मदत केलीन् तिनं.

**शरद** : माझ्या माहितीची नाहीं ही बाई !

**मन्दा०** : तुझ्या माहितीची कशी असेल ? वहिनी आणि ती शाळेंत एका वर्गांत होत्या. सुमारें वर्ष झालं तिला इथं येऊन. तेव्हांपासून इथंच आहे ती.

**शरद** : प्रभाकराला अगदीं चुकल्यासारखं वाटत असेल नाहीं ? म्हणूनच मला वाटतं तो उशीरां येत असावा.

**मंदा०** : दादाला नोकरी नव्हती तोंपर्यंत त्यानं नाहीं मनावर घेतलन्--तसं करण्यावांचून गत्यंतरच नव्हतं म्हणा !—पण अलीकडे मात्र मुद्दामच उशीर करून येतो.

**शरद** : म्हणजे ? मी नाहीं समजलों तूं काय म्हणतेस तें ?

**मन्दा०** : दादाच्या मनांतून वहिनीनं आतां नोकरी करूं नये असं आहे. त्याला बऱ्यापैकीं पगार मिळत आहे. तेव्हां वहिनीनें आतां नोकरी सोडून पूर्वी-प्रमाणेंच संसारांत लक्ष घालावं असं त्याचं म्हणणं आहे.

**शरद** : एवढंच ? प्रभावहिनी सहज करील ते !

**मंदा०** : अंहं. प्रभावहिनी नोकरी सोडायला मुळींच तयार नाहीं.

**शरद** : खरं ?

**मंदा०** : हं. ती म्हणते चार पैसे घरांत जास्त येताहेत ते कशाला घालवायचे ? नोकरींत ती आतां पूर्णपणें रुळली आहे. ( क्षणभर दोघेही स्तब्ध बसतात. मंदाकिनीला स्वस्थ बसणें जड जात आहे. विचार केल्यासारखं दाखवून ) शरद, फिरायला येतोस ? वाटेंत कुठंतरी चहाही घेऊं.

**शरद** : म्हणजे ? तुझाही चहा नाहीं झाला अजून ?

**मंदा०** : छे ! एकटीसाठीं करायचा कंटाळा आला होता अगदीं.

**शरद** : तुला आवडत असेल तर जाऊं या.

**मंदा** : पहा हं शरद. उगीच चिडवूं नकोस मला.

**शरद् :** बरं जाऊं या चला. —पण हो. फिरण्यासारखं स्थळ तरी आहे का इथं ?

**मंदा :** इश्श ! नवीन आलास जसा कांही या गांवांत. [उजव्या हाताच्या दरवाजाकडे जात] आलेंच हं [तो तिच्याकडे हंसून बघतो–ती आंत जाते व आरशांत पाहून केंसावरून हात फिरवते व परत बाहेर येते. ]

**शरद् :** मला वाटलं होतं कीं, तुझी तयारी होईतों एक झोंप काढून घ्यावी. (ती मान उडवते. दोघेंही हंसतात व डाव्या हाताच्या दरवाजानें बाहेर जातात. मंदाकिनी परत येऊन घाईघाईनें 'गिरजे, खोलींत मधू निजला आहे ग' असें ओरडते व आपलें बोलणें गिरजेनें ऐकलें कीं नाहीं हें पाहण्याच्या भरीस न पडतां निघून जाते. गिरजा आंतून 'होय ताई' असें म्हणत बाहेर येते व मंदाकिनी गेल्याचें पाहून परत आंत जाते. उजव्या हाताच्या दरवाज्यानें सहासात वर्षे वयाचा मधू बाहेर येतो. निळी चड्डी व पांढरा शर्ट असा त्याचा पोशाख आहे. पण तो मळलेला आहे. दोन्हीं हाताच्या तळव्यानें डोळे चोळीत तो आजूबाजूला पाहतो. नंतर समोरच्या दरवाज्यांतून आंत जाऊन मांडणीवरील एक डबा काढूं लागतो. डबा त्याच्या पायावर पडतो. तो ओरडतो. बाहेरून प्रभाकर–वय वर्षे ३५, तरतरीत पण मुद्रा संत्रस्त व त्रासिक–प्रवेश करतो. मधूचें ओरडणें ऐकून तो लगबगीनें पुढें होतो व त्याला उचलून आणतो. )

**प्रभाकर :** कुठं लागलं बघूं ?–पायाला ? थांब हं. आपण मंत्र घालूं. 'आला मंतर कोल्हा मंतर कोल्ह्याची आई कांदे खाई, मधूचा बाऊ बरा होई !' झाला बरा ! झाला ना ? हं [दोघेही हंसतात] हं आतां सांग पाहूं. त्या डब्याजवळ काय करीत होतास ?

**मधु० :** किनई, दादा मला भूक लागली होती म्हणून—

**प्रभाकर :** आज दुपारीं खाल्लं नाहींस कांहीं ?

**मधुकर :** खाल्लं. पण थोडं अगदीं. पोटसुद्धां भरलं नाहीं. पुन्हां भूक लागली म्हणून बघत होतो कांहीं सांपडतय् का ?

**प्रभाकर :** गिरजे. ए गिरजे. [आंतून 'जी'] इकडे ये पाहूं.

**गिरजा :** काय दादा ?

**प्रभाकर :** आज घरांत खायला कांहींच शिल्लक नव्हतं वाटतं ?

**गिरजा :** सगळे डबे पालथे. थोडं होतं ते दिलं कीं मधूला.

**प्रभाकर :** तुझ्याजवळ दिलेले पैसे ?—

**गिरजा :** किती दिवस पुरणार ते ?

**प्रभाकर :** बरं. काकूंना म्हणावं जेवायचं जरा लवकरच करा.

**गिरजा :** काकू ? त्या कुठं आल्यात ? आज येणार नाहींत असं वाटतं !

**प्रभाकर :** काकू आल्या नाहींत ? बरं जा तूं कामाला. [मधूस] चल आपण खाऊन येऊं बाहेरच कांहींतरी.—अरर, काय हा तुझा अवतार ? मातींत खेळत होतास वाटतं ? थांब. तुला प्रथम साफ केला पाहिजे. [ आंतून एक टॉवेल भिजवून आणतो व मधूचें तोंड व हातपाय पुसतो. शर्ट काढून दुसरा घालतो व केंस नीट करतो. ] गुलामाला मातींत खेळायला पाह्यजे. घर पुरत नाहीं वाटतं खेळायला ?

**मधुकर :** घरांत एकटं खेळायला आम्हांला कंटाळा नाहीं वाटतं येत ? आई सोबत होती तेव्हां नव्हतो वाटतं घरांतच खेळत ?

**प्रभाकर :** बरं, बरं. चला आतां ( त्याचें बोट धरून त्याला घेऊन जात असतां दरवाज्यांत त्याला प्रभावती दिसते. एक पाऊल मागें घेऊन तो तिला कांहींतरी विचारणार तोंच तिच्या पाठीमागें दुसरी स्त्री पाहून तो गप्प बसतो व मुकाट्यानें मधूला घेऊन निघून जातो ) ( प्रभावती वय २८, दिसायला प्रौढ व किंचित् स्थूल, मुद्रा करारी पण सात्विक. गुलाबी रंगाचें जरीचें सकच्छ पातळ व ब्लाऊझ. केंसांचें चक्र. कुंकूं अगदीं बारीक नाहीं. कानांत कुडी व गळ्यांत चंपाहार. कमल सडपातळ व मध्यम उंचीची. पोपटी रंगाचें विकच्छ पातळ व त्याच रंगाचा गळ्याचा भाग उघडा टाकलेला असा बिनबाह्यांचा ब्लाऊझ. कानांत इअरिंग्ज, केंसांचा शेपटा, चेहरा, ओठ व नखें रंगविलेली. एकंदरीत आकर्षक, प्रभावतीच्याच वयाची )

**प्रभावती :** [ मनीबॅग व छत्री खोलींत ठेवून येते ] कमल बस हं. चहा-फराळाचं सांगून येतें.

**कमल :** उगीच कशाला त्रास घेतेस प्रभा ?

**प्रभावती :** वाः उगीच कसं ? उद्यांपासून तूं ही नोकरी सोडून जाणार–

**कमल :** ही नोकरी सोडली म्हणून गांव नाहीं सोडून जात. लहानपणा-पासूनची आपली मैत्री इथंच संपवायचा विचार आहे कीं काय तुझा ?

**प्रभावती :** इश्श ! मी असं म्हणतें आहें वाटतं ?–पण ही नोकरी सोडून दुसरीकडे धरलीस कीं, नाहीं म्हटलं तरी आपला सहवास आतांइतका निकटचा राहणार नाहीं, हें नक्की. रोज गांठही पडणं कठीण जाईल. म्हणूनच तुला चहा-फराळाला मुद्दाम बोलावलं.–आणि काय ग, मैत्री अशी संपवूं म्हटल्यानें संपत नसते. तूं माझी लहानपणापासूनची मैत्रीण. शिवाय तूं इथं आल्यानंतर वेळोवेळीं इतकी मदत केलीस—

**कमल :** [कडवटपणानें] हें पहा प्रभा, मी जें कांहीं करतें तें माझ्या मनाला समाधान वाटावं म्हणून; दुसऱ्या कोणावर उपकार करण्यासाठीं नव्हे. म्हणून त्याचा उच्चार किंवा तें केल्याबद्दल माझी स्तुति केलेली मला आवडत नाहीं.

**प्रभावती :** बरं राह्यलं. चहाफराळाचं घ्यायला तुझी हरकत नाहीं नं ? झालं तर. [ दरवाज्यापाशीं जाऊन ] काकू, अहो काकू–

**गिरजा :** [ प्रवेश करून ] काकू आल्या नाहींत अजून.

**प्रभावती :** [आश्चर्यानें] अजून आल्या नाहींत काकू ! [ घड्याळ पाहत ] साडेसहा व्हायला आले; आतां कसल्या येताहेत त्या ! गिरजा, जा ग हॉटेलांतनं चहा आणि कांहींतरी फराळाचं घेऊन ये.

**गिरजा :** काय आणूं वहिनी ?

**प्रभावती :** थांब, लिहूनच देतें. [टेबलाजवळ जाऊन विचार करीत लिहिते] हं, हें घे. हे पैसे पण घे. त्याला सांग लवकर पाठव म्हणून. [ गिरजा जाऊ लागते ]

**कमल :** गिरजा, बघूं ग काय मागवलंन् आहे तें ? [ गिरजेच्या हातांतून चिठी घेऊन ] जा पाहू तूं आपल्या कामाला.

**प्रभावती :** हें ग काय कमल ?

**कमल :** म्हणजे असं कीं, मला या वेळेला कांहीं नको आहे.–आणि हॉटेलांतलं तर मुळींच नको आहे. असं ग काय एखाद्या परक्यासारखं वागवतेस

मला ? इथं तुझ्याकडे येईन तेव्हां प्रत्येक वेळीं कांहींतरी खाल्लं पाहिजे असा नियम नाहीं. एखाददां तरी जाऊं दे मला न खातां. बस पाहूं इथं. तुझ्या इथं आलं आणि चार सुखदुःखाच्या गोष्टी बोललं कीं मला किती बरं वाटतं !

**प्रभावती :** बरं, जाऊं दे. गिरजा जा तूं आपल्या कामाला.

**कमल :** प्रभा, खूपच आनंद झालेला दिसतोय् तुला ?

**प्रभावती :** कां ग नाहीं होणार आनंद मला ? [ उठून इकडे तिकडे फिरते. ] वर्षसुद्धां नाहीं झालं मला नोकरीला लागून, तोंच दहा रुपयांनीं माझा पगार वाढला. इतरांना किती हेवा वाटला माझा ? कांहींना तर सहा सहा वर्षं नोकरी करून सुद्धां माझ्याइतका पगार मिळत नाहीं.

**कमल :** हेवा न करतील तर काय करतील बिचारे. मरमर कामं करायची पण त्याचं चीज मात्र नाहीं. शिवाय आधींच पुरुष आणि त्यांतून बेकारी. नडफडत करतात झालं कामं !

**प्रभावती :** बाकी, तूं जर कामांत मदत केली नसतीस किंवा नोकरी सोडून गेली नसतीस तर कांहीं पगारवाढीची आशाच नको होती करायला मला.

**कमल :** असंच कांहीं नाहीं. अग एखादी स्त्री ऑफिसांत असणं हें भूषण वाटतं मालकांना अलीकडे. त्यांतून सुंदर असली म्हणजे बघायलाच नको.

**प्रभावती :** उगीच कांहीं तरी बोलूं नकोस हं कमल. मला नाहीं आवडत.

**कमल :** तुला नसलं आवडत तर नाहीं बोलत मी. माझा आपला अनुभव सांगते आहे मी. तूंच पहाना. आपल्याला कधींतरी त्रासाचं किंवा मेहनतीचं काम देण्यांत येतं का ? सोपं, बिनत्रासाचं आणि लवकर आटोपणारं असं काम आपल्याकडे; आणि त्रासाची मोठमोठालीं कामं तेवढी पुरुषांकडे. आपण हंसतखेळत कामं केलीं किंवा वेळ काढीत बसलों तर कोणीही आपल्याला बोलत नाहीं. तेंच पुरुषांकडे पहा. जरा मान वर करायची सोय नाहीं. बरं, पगारही त्यांच्या बरोबरीनं किंवा जास्त. कां ग असं ? मला वैषम्य वाटतं या भेदभावाचं.

**प्रभावती :** आपल्याला काय करायचंय् त्यांच्याशीं ? आपण कांहीं सांगत नाहीं वरिष्ठांना असा भेदभाव करा म्हणून.

**कमल :** लहानपणापासून पाहतें आहें, तशीच आहेस अजून. स्वतः पलीकडे मुळीं तुला पाह्यलाच नको. तूं बोललीस तें झालं तुझ्या दृष्टीनं. वरिष्ठांची दृष्टी निरालीच असते. अग, आपण सर्व एके ठिकाणीं कामं करतो— आपल्याला एकमेकांबद्दल नको वाटतं विचार करायला ?

**प्रभावती :** म्हणून वाटतं आपण होऊन त्यांचीं कामं करीत असतेस तूं ?

**कमल :** मला त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटते. शिवाय ते तिकडे मरेमरेतों कामं करीत असतां आपण जर हंसतखेळत राह्यलों तर त्यांच्या श्रमांत आणखी वैषम्याची भर पडते; आणि साहजिकच ते आपण द्वेष करूं लागतात. मला तसं व्हायला नको आहे. एके ठिकाणीं कामं करायचीं तीं खुल्या मनानं आणि सहकार्यानंच झालीं पाहिजेत. म्हणून मी त्यांचीं कामं करतें.

**प्रभावती :** तरीच तुझ्याविषयीं बहुतेकांचं चांगलं मत आहे. पण पुरुषांशीं तूं मिळून मिसळून वागतेस त्याचा मात्र भलताच अर्थ करतात लोक.

**कमल :** त्यांच्याकडे लक्ष देऊन कसं चालेल माझं ?

**प्रभावती :** माझ्याविषयीं असं बोललेलं मला नाहीं खपायचं !

**कमल :** काय करशील ग तूं ?

**प्रभावती :** सोडून देईन नोकरी मी ?

**कमल :** तुला काय ? पतिराज मिळवते आहेत.—पण मला नाहींना नोकरी सोडतां येत !

**प्रभावती :** काय ग कमल, तू लग्न ग कां नाहीं केलंस ?

**कमल :** कारण माझ्या स्वभावाला तें मानवणार नाहीं म्हणून.

**प्रभावती :** मुलखावेगळा स्वभाव आहे कीं काय तुझा ? लहानपणापासून मी पाहतें आहें; इतर मुलींत आणि तुझ्यांत कांहींच फरक आढळला नाहीं.

**कमल :** त्यावेळीं माझा स्वभाव इतर मुलींसारखा असेल. पण आतां नाहीं. तुला ठाऊकच आहे कीं, मीं बारा वर्षांचीं असतांना माझे आईबाप वारले. माझ्या एका चुलत्यानें मला आपल्या घरीं नेलं. मी सोळा वर्षांचीं झालें. माझ्या चुलत्यानं माझं लग्न एका म्हाताऱ्या श्रीमंताशीं ठरवलं. त्यापासून खूप फायदा होणार होता त्याचा. माझ्या सारं कांहीं लक्षांत आलं आणि त्या लग्नाला साफ

नकार दिला . चुलत्यानं आकाशपाताळ एक केलं; आणि चार वर्षं पोसल्याचं बोलून दाखवलं. मला संताप आला आणि त्याक्षणीं मीं घराबाहेर पडलें. एका अनाथाश्रमांत शिक्षण पुरं केलं. तेव्हांपासून कोणावरही अवलंबून न राहतां स्वतंत्रपणें राह्यचं असं मीं ठरवलं.

**प्रभावती :** असं होय ?–पण लग्न करून संसार करावा असं नाहीं तुला वाटत ?

**कमल :** वाटतं, नाहीं असं कसं होईल ? गेल्या सहासात वर्षांत असं कितीकदां वाटलं असेल, आणि अजूनही वाटतं.

**प्रभावती :** पण नोकरी केली तरी लग्न करायला काय हरकत आहे ?

**कमल :** हरकत नाहीं असं नाहीं. समज, मीं लग्न केलं आणि त्यांना मी नोकरी करणं पसंत नसलं, म्हणजे मग ? साहजिकच त्याचा परिणाम वितुष्ट येण्यांत होणार. त्यापेक्षां आहे तेंच बरं चाललंय असं मला वाटतं.

**प्रभावती :** तुला लग्नावांचून कसं राहवतं कुणास ठाऊक ?

**कमल :** कां बरं ? युरोप अमेरिकेंत नाहीं वाटतं स्त्रिया लग्नाशिवाय रहात ?

**प्रभावती :** अस्सं होय ? [दोघीही थोडावेळ स्तब्ध बसतात.]

**कमल :** बरं, प्रभा, जाते हं मी आतां.

**प्रभावती :** चाललीस ? येत जा हं मधून मधून.

**कमल :** जरूर येईन. मला आनंद होईल तुझ्याकडे येण्यानं. पण तुला आवडेल कां माझं येणं ? मी ही अशी—

**प्रभावती :** इश्श् ! कांहींतरी नकोस बोलूं. तूं कशीही असलीस तरी माझी बाल-मैत्रीण.-आणि शिवाय माझ्यासाठीं तूं-तुला आवडणार नाहीं म्हणून नाहीं बोलत पुढें.

**कमल :** बरं. जाते हं. (कमल जाते. प्रभावती क्षणभर दरवाज्याकडे पाहत उभी राहते व नंतर मागें वळून गिरजाला हांक मारते.)

**प्रभावती :** गिरजा, अग गिरजा. [आंतून प्रथम 'जी' व नंतर गिरजा बाहेर येते.] हें बघ. त्या राजशाही बोर्डिंग हाउसमधून दोन डबे घेऊन ये.– आणि हें बघ, डब्यांत चपात्यांऐवजीं श्रीखंडपुरी घालायला सांग. हे घे पैसे. [गिरजा जाऊं लागते.] तुला होईल उशीर; तूंही इथंच जेव.

**गिरजा :** नको वहिनी. त्या डब्यांतलं अन्न मला नाहीं गोड लागायचं. घरीं भाकऱ्या भाजून ठेवल्या आहेत, त्या जाऊन खाईन. घरधनी आणि लेक वाट बघत असतील.

**प्रभावती :** बरं जा. (गिरजा जाते. प्रभावती एक क्षणभर तशीच उभी राहते. नंतर उजव्या बाजूच्या कपाटासमोर उभी राहून केंस व्यवस्थित करते. ती खूप आनंदांत आहे. साहजिकच तिच्या तोंडांतून गाणें बाहेर पडूं लागते. कांहीं किरकोळ उद्योग करीत ती गाणं म्हणत असते. गाणें संपण्याच्या सुमारास दारांत प्रभाकर व मधुकर येऊन उभे राहतात. गाणें संपतांच प्रभाकर पुढें होतो व सरळ उजव्या हाताच्या खोलीकडे जाऊं लागतो.)

**प्रभावती :** [लडीवाळपणानें] घरांत दुसरी माणसं आहेत म्हटलं [तो कांहीच बोलत नाही.] एवढंसुद्धां लक्ष नाहीं वाटतं ? कुठं गेला होतात मधूला घेऊन ?–आणि ऑफिसचे कपडेही बदलले नाहींत.

**मधुकर :** आई, आज आम्हीं काय गंमत केली सांग पाहूं ?

**प्रभावती :** [त्याला जवळ घेऊन] गंमत केलीत तुम्ही ? कोणती बरं ? हं. आम्हांला नाही वाटतं सांगायची ?–आणि आम्हांला नाहीं नेलंत तें ?

**मधुकर :** पण तूं होतीसच्च कुठं इथं ? तूं गेली होतीस ऑफिसांत.

**प्रभावती :** सांग पाहूं काय गंमत केलीत ती ?

**मधुकर :** सांगू ? नाहीं ओळखत तुला ? [ती मानेनें 'नाहीं' व तोंडानें 'अंहं' म्हणते] तुम्ही दोघं गेलांत कामावर. दुपारीं मला लागली भूक. घरांत खायला अगदीं थोडं होतं. मग काय करायचं ? निजलों तसाच. संध्याकाळीं दादा आले, तेव्हां आम्ही गेलों हॉटेलांत. आम्हीं काय काय खाल्लं तिथं ? बुंदीचा लाडू, शंकरपाळे—

**प्रभावती :** [प्रभाकराकडे अर्धवट पाहत] हॉटेलांत गेला होतात तुम्ही ?

**मधुकर :** मला खूप भूक लागली होती म्हणून गेलों आम्ही.

**प्रभावती :** बरं, मी आतां काकूना खूप फराळाचं करून ठेवायला सांगेन हं. [मधुकर जांभई देतो.] अजून झोंप येते आहे वाटतं ? जां आंत पलंगावर जाऊन नीज हं.

**मधुकर :** आई, तूं चल ना माझ्याजवळ निजायला.

**प्रभावती :** असा हट्ट नाहीं करायचा. मी आत्तांच कामावरून आलें आहें. अजून कपडे बदलायचेत, जेवायचंय्—

**मधुकर :** मग जेवण झाल्यावर येशील ?

**प्रभावती :** येईन हं. जा आतां [ प्रभावती त्याला आंत पोंचवून येते. ]

( प्रभाकर व प्रभावती दोघेंही थोडावेळ स्तब्ध बसतात. दोघांनाही कांहींतरी बोलायचं आहे;–पण तें कसं बोलावं हें न समजल्यामुळं दोघेही कांहींतरी चाळा करीत आहेत. त्यांच्या मनांतली खळबळ पार्श्वसंगीतांतून निघणाऱ्या तीव्र स्वरांनीं दर्शविली जात आहे. )

**प्रभावती :** एक बातमी सांगायची आहे तुम्हांला.

**प्रभाकर :** नोकरी सुटली वाटतं तुझी ?

**प्रभावती :** ही आनंदाची बातमी आहे वाटतं ?

**प्रभाकर :** तुझी बातमी आनंदाची आहे हें माहीत नव्हतं मला.

**प्रभावती :** मला वरची जागा मिळाली आणि पगारही दहा रुपयांनीं वाढला.

**प्रभाकर :** [ उदासीनतेनं ] आनंदाची गोष्ट आहे. आतां तुला तुझ्या आवडीच्या वस्तु विकत घेतां येतील. माझ्या एकट्याच्या पगारांत कधींच शक्य नाहीं झालं तें.

**प्रभावती :** माझ्या आवडीच्या वस्तु मला कधीं मिळाल्या नाहींत, असं एका शब्दानं तरी मीं बोलून दाखवलं आहे कधीं ?

**प्रभाकर :** जें प्रत्यक्ष दिसतं आहे, तें बोलून कशाला दाखवायला पाहिजे ?

**प्रभावती :** माझ्या वागण्यांत कधीं दिसलं तुम्हांला असं ?

**प्रभाकर :** तुझ्या बोलण्यांत अगर वागण्यांत दिसलं नाहीं तरी ती गोष्ट खोटी आहे का ?

**प्रभावती :** साफ खोटी आहे. पूर्वी मला असं कधींच वाटलं नाहीं; आणि आतांही वाटत नाहीं.

**प्रभाकर :** मला आपलं वाटलं तसं.

**प्रभावती :** कशावरून म्हणतां तुम्ही ?

**प्रभाकर :** सांगूं ? आतां तूं नेसली आहेस असं पातळ तूं पूर्वी कधीं घेतलं होतंस ?—मागितलं होतंस ?—नाहीं ना ? आज तूं नोकरी करते आहेस म्हणूनच शक्य झालं तें. तसलं पातळ आवडत असल्याशिवाय काहीं तूं विकत घेतलं नाहींस तें !

**प्रभावती :** तुम्हांला हें पातळ आवडलं नाहीं तर तसं कां नाहीं सांगितलंत ?

**प्रभाकर :** माझ्या आवडीचा प्रश्न येतोच कुठं ? तुझी तूं घेणारी समर्थ आहेस.

**प्रभावती :** आजपर्यंत तुमच्या संमतीशिवाय एक तरी गोष्ट केली आहे मीं ?

**प्रभाकर :** मी तरी तुझ्या सांगण्याबाहेर कधी गेलों आहें का ?

**प्रभावती :** खरोखरच पूर्वी कधींही तुम्हीं मला दुखवलंत नाहीं. अलीकडे मात्र मला टोचून बोलून मला दुखविण्यांत आनंद मानतां तुम्ही.

**प्रभाकर :** आणि तूंही पूर्वी माझ्या मनाविरुद्ध वागली नाहींस.—अलीकडे मात्र तसं वागण्यानं आनंद होतो तुला.

**प्रभावती :** कुणी सांगितलं तुम्हांला मला आनंद होतो म्हणून ?

**प्रभाकर :** ज्या गोष्टीपासून तुला आनंद होत नाहीं, ती गोष्ट कर असं सांगितलं कुणीं तुला ?

**प्रभावती :** माझ्या माणसांच्या सुखाकरतां करतें आहें मी.

**प्रभाकर :** पण त्यापासून त्यांना तर उलट त्रास होत आहे.

**प्रभावती :** कित्येक वेळां माणसांना सुखही खुपूं लागतं. तुमच्या एकट्याच्या पगारांत पूर्वी आपली किती ओढाताण व्हायची ? अगदीं हव्या असणाऱ्या वस्तूही आपल्याला कधीं घेतां येत नव्हत्या. दुसऱ्याची हौस भागविण्यासाठीं आपल्यापैकीं कुणाला तरी स्वतःची हौस बाजूला ठेवावी लागत असे. आतां पूर्वीसारखी चणचण भासत नाहींच, उलट आपल्या गरजा व आवडीनिवडी भागून, चार पैसे शिल्लक टाकतां येतात आपल्याला.

**प्रभाकर :** पण त्या वेळच्या त्या त्यागांत आणि अतृप्तींतच आपण जास्त सुखी होतों. वेळच्यावेळेवर जेवणखाण मिळत होतं. आणि सर्व कांहीं समा-

धानानें आणि मनमिळाऊपणानें व्यवस्थित चाललं होतं. काय जाळायचे आहेत ते पैसे शिल्लक टाकून ? पैशाचा उपयोग नीटपणें होत असेल तरच त्याला कांहीं किंमत आहे.

**प्रभावती :** पुन्हां आपलं तेंच ! सर्व कांहीं आपल्याला मिळतंय् –

**प्रभाकर :** पण तें वेळच्या वेळीं मिळतंय् का हाच प्रश्न आहे. आतांच पहाना. मधूच्याकरतां दीड डझन कपडे शिवून ठेवले आहेस.–पण त्याच्या आंगावर मात्र मळके कपडे ! कोण बदलणार नेहमी ? गेल्या आठवड्यांत घरांतले डबे फराळाच्या जिनसांनी भरलेले होते.—पण त्याचा उपयोग ती मोलकरीण आणि तिची मुलगी यांच्याशिवाय कोणाला तरी झाला कां ? आज तर मधूला उपाशींच रहावं लागलं. गिरजाला कांही बोलावं तर आत्तां चालती होईल. गरज आहे आपल्याला !

**प्रभावती :** गेले सहा महिने मी पाहतें आहें; कोणतीही गोष्ट घडो. तिचा संबंध माझ्याशीं लावून, तुम्ही माझ्यावर चिडता, रागावता आणि वाटेल तें बोलतां. काय असं घोडं मारलंय् मी तुमचं ? चारचौघांत वाईट दिसेल अशी कोणती गोष्ट मीं केली आहे ? नोकरी करते, चार पैसे जास्त घरांत येतात आणि आपण जरा व्यवस्थित राहतों, हें लोकांना पाहवत नाहीं. दुसरं काय ? माझ्या विरुद्ध कुणीं तरी तुमच्या मनांत भरवलेलं दिसतंय्.

**प्रभाकर :** लोकांनी मला कांहींही सांगितलं नाहीं; आणि जरी कुणीं कांहीं सांगितलं तरी त्यावर विश्वास ठेवण्याइतका मी मूर्खही नाहीं. तुझ्या नोकरीचे परिणाम मला प्रत्यक्ष दिसताहेत म्हणूनच तुला सांगतोय्—( यापुढं दोघंही चिडून बोलतात. )

**प्रभावती :** नोकरी सोड म्हणून ना ? ठाऊक आहे मला तें.

**प्रभाकर :** ठाऊक असून मुद्दाम करते आहेस तसं ?

**प्रभावती :** माझ्याचकरतां करतें आहें सारी धडपड ?

**प्रभाकर :** मग काय आमच्याकरतां ?

**प्रभावती :** नाहीं गांवांतल्या लोकांकरतां !

**प्रभाकर** : नोकरी कर म्हणून नारळ घेऊन बोल्वायला आलं होतं तुला कुणी ?

**प्रभावती** : बोल्वायला कशाला पाहिजे ? तुम्हांला नोकरी नव्हती. घरांत चूल पेटायला पाह्यजे; म्हणून मला नोकरी धरावी लागली.

**प्रभाकर** : तुझे अनंत उपकार आहेत माझ्यावर !

**प्रभावती** : मीं कांहीं कुणावर उपकार नाहीं केले. माझं कर्तव्य मीं केलं.

**प्रभाकर** : तुझं कर्तव्य अजून संपलं नाहीं वाटतं ?

**प्रभावती** : मग काय ? तुम्हांला नोकरी लागतांच मी नोकरी सोडून द्यायला पाहिजे होती ? गरज सरो आणि वैद्य मरो.

**प्रभाकर** : गरजेपुरतीच वैद्याची जरूर असते. प्रभा, तुला आठवतं ? प्रथम तूं नोकरी करायला मुळींच तयार नव्हतीस. कमलाबाईंनीं तुला तयार केलं, म्हणूनच तूं तयार झालीस. किती अभिमान वाटला मला त्यावेळीं तुझा. वास्तविक तूं शिकलेली होतीस. आपण होऊन नोकरी करायला तुला मुळींच हरकत नव्हती.—पण तूं नोकरीवर गेलीस कीं, माझं आणि मधूचं नीट होणार नाहीं, आणि घरांतही तुझं लक्ष राहाणार नाहीं, म्हणून नोकरी धरायला तुझं मन कचरत होतं—

**प्रभावती** : माझ्या नोकरीमुळं तसं कांहीं एक होणार नाहीं, याची मला त्यावेळीं कल्पनाही नव्हती.

**प्रभाकर** : म्हणजे ? तुझ्या नोकरीमुळं कांहीं फरक झाला आहे असं नाहीं वाटत तुला ?

**प्रभावती** : मधूच्या बाबतींत थोडं फार कमी होत असेल, नाहीं असं नाहीं.—पण तेवढ्याकरतां मीं अगदीं नोकरी सोडून घरांतच बसलं पाहिजे असं नाहीं. तुमचं सर्व कांहीं पूर्वीप्रमाणेंच यथास्थित चाललंय्—काय मोठासा फरक पडलाय् ?

**प्रभाकर** : मोठासा फरक ? केवढा मोठा फरक पडलेला दिसतोय् मला. बाहेर नव्हे, [ हृदयावर हात ठेऊन ] इथं—मनांत. मायेच्या अन् प्रेमाच्या पोटीं जशा गोष्टी घडून येतात तशा पैशाच्या मोलानं घडून येत नसतात. तूं घरांत वावरत होतीस तेव्हां प्रेमाचं अन् समाधानाचं वातावरण सर्व घरभर पसरलेलं

असे. किती उल्हास अन् प्रसन्न वाटायचं घरांत.— पण आतां ? घर आहे पण त्याला एखाद्या हॉटेलची कळा आलेली आहे. देव नसलेला देव्हारा झालंय हें घर. आपल्या नांवावर घर आहे, आणि गडीमाणसांना आपण पगार देतों म्हणूनच हें घर आपलं म्हणायचं !

**प्रभावती :** तुमचं म्हणणं काय ? मी पुन्हां घरांत कोंडून घ्यावं आणि तुमची सेवाचाकरी करण्यांत आनंद मानावा असंच ना ?

**प्रभाकर :** [ सस्मित होऊन ] तूंच बोलते आहेस हें ! तूं अशा रीतीनें बोलशील असं मला स्वप्नांतही कधीं वाटलं नव्हतं. तूं नोकरी धरीपर्यंत तुला या घरांत कोंडल्यासारखं वाटत होतं ? माझं जें काय तूं करीत होतीस तें तुला सेवाचाकरीसारखं वाटतं ? मला वाटत होतं तुझं माझ्यावर प्रेम आहे, आणि संसारांतील गृहिणीचीं कर्तव्यं करणं तुला आवडतं म्हणूनच तूं तें करीत आलीस. [ थोडें थांबून ] माझ्यापेक्षां कमी तुला मी कधींच समजलों नाहीं. पगार येतांच पैशाचं पाकीट तुझ्या स्वाधीन करून कसलाही खर्च केलास तरी एका शब्दांतही कधीं तुला विचारलं नाहीं. उलट सर्वस्वीं तुझ्या अर्ध्या वचनांत वागत होतों मी.—[ पुन्हां थोडं थांबून ] लग्न झाल्यावर तुला पुढं शिकायचं होतं. थोड्या पगारामुळं तें शक्य झालं नाहीं; म्हणून सकाळ संध्याकाळ शिकवण्या करून तुझी शिकण्याची इच्छा मीं पुरी केली. दोनअडीच वर्षं मी रोज १३-१४ तास खपलों. तुझं शिक्षण पुरं झालं तरी तूं घर मोडलं नाहींस. पुढं मधू जन्माला आला. तुझ्या गोड व प्रेमळ वागण्यानं आणि मधूच्या बाललीलांनीं संसाराचं नंदनवन बनलं होतं. किती सुखांत होतो आपण ! [ तिच्या दोन्हीं खांद्यांवर हात ठेवून ] प्रभा, अशा नंदनवनाला तूं कोंडवाडा समजतेस ?

**प्रभावती :** तुम्ही मला वाईट वागवत होता, असं मी कधींच म्हटलं नाहीं. माझ्या शिक्षणाचा उपयोग कांहींच होत नव्हता असं माझं म्हणणं आहे. एखादी अशिक्षित बाईसुद्धां संसार चांगला करील.—पण आतां माझ्या शिक्षणाचं, माझ्या अंगच्या हुशारीचं, माझ्या बुद्धीचं चीज होत आहे. आजच पहाना. दुसऱ्या दोनचार 'सीनिअर' माणसांना वगळून मलाच वरची जागा देण्यांत आली.

**प्रभाकर :** आलं लक्षांत माझ्या. [ एकदम संतापून ] पैशाची धुंदी तुझ्या डोळयावर चढली आहे. तुझ्या गुणांचं आणि हुशारीचं चीज गोड व प्रेमळ शब्दांनीं होऊन भागत नाहीं; ते रुपये-आणे-पैनीं व्हायला पाहिजे आहे. पैसा तुला अधिक मोलाचा वाटूं लागला आहे. आज मी तुला सांगतोंय्, पण तें पटत नाहीं. कदाचित् पुढें येईल तुला अनुभव. आतां यापुढें एक शब्दसुद्धां बोलणार नाहीं, या बाबतींत. मंदेला जशी मोकळी मोडली-( दरवाज्यांत पावलं वाजलेलीं व त्याबरोबरच हंसण्याचा आवाज कानीं आल्यामुळें तो चपापून मागें बघतो.-शरद-मंदा हंसत आंत येतात, प्रभाकर-प्रभावतीस पाहून चपापतात. )

**शरद :** हॅलो Old Boy, How are you? झाली वाटतं घरीं येण्याची वेळ-?

**प्रभाकर :** आं ! शरद ! -आणि तूं केव्हां आलास ?

**शरद :** आलों पांच साडेपांच वाजतां-काळ बदलला आणि यजमानांनीं पाहुण्यांची चौकशी करण्याऐवजीं पाहुण्यांनाच यजमानांची चौकशी करण्याची वेळ आली आहे.

**मन्दा० :** यजमान नसले तरी, यजमानांचा प्रतिनिधि होता बरं कां ?

**शरद :** शाबास ! लाज राखलीस भावाची. काय रे प्रभाकर, पतिपत्नीच्या एकांतात असं एकदम येणं शिष्टसांप्रदायाला धरून नाहीं.-नाहीं कां ? आतां तुमचं कांहीं विशेष चाललं नव्हतं म्हणून बरं. माफ कर हं.

**प्रभाकर :** हें पहा शरद, [ शरदच्या थट्टेचा याच्यावर कांहींच परिणाम झालेला नाहीं ] मी आपला सरळ व्यवहारी मनुष्य आहें. Formalities चा मला अगदीं तिटकारा आहे.-आणि समजा, तुझ्याकडून शिष्टसांप्रदायाला धरून वागणं झालं नाहीं तरी दोष तुझा नाहीं. दार उघडंच होतं.

**शरद :** काय रे, बराच गंभीर बनला आहेस ?-[ तो आणखी कांहीं बोलणार तोंच मंदा एकंदर रागरंग ओळखून त्याच्या हाताची बाही धरून ओढून त्याला सूचना देते. ]

**मन्दा :** दादा, शरद आला त्या वेळीं तूं घरीं नव्हतास. बराच वेळ तुझी वाट पाहयलन् त्यानं;-कंटाळला बसून. म्हणून मग आम्ही फिरायला गेलों.

**प्रभाकर :** पण आगाऊ पत्र वगैरे न पाठवतां एखाद्या धूमकेतूसारखा एकदम कसा उपटलास ?

**शरद :** एका ठिकाणाहून निघालेले खलाशी पुन्हां पूर्वीच्या ठिकाणीं परत येतात तसाच ! अरे, किती झालं तरी तुमच्यांत वाढलेला मी; तुमची आठवण झाल्याशिवाय राहील होय ? म्हटलं यावं एकदां भेटून तुम्हांला. ओळख तरी आहे का नाहीं तें तरी पहावं. काय वहिनी, ओळख आहे का विसरलांत ?

**प्रभावती :** अशी ओळख कुणी विसरतं वाटतं ?

**प्रभाकर :** कायरे शरद, आमची आठवण तुला वारंवार येत होती, हें खरं का रे ?

**शरद :** खरं नाहीं तर काय खोटं वाटतं ?

**प्रभाकर :** आमची म्हणजे कुणाकुणाची रे ?

**शरद :** कुणाची म्हणजे ?–तुझी, प्रभावहिनीची, मधूची–[ थांबतो. ]

**प्रभाकर :** आणखी नाहीं कुणाची ?

**शरद :** [ डोके खाजविल्यासारखें करून ] आणखी कोण बुवा ? आणखी एखाद्या माणसाची आठवण ठेवायची विसरलों वाटतं ? अंहं, दृष्टीसमोर येत नाहीं आणखी कुणी ?

**प्रभाकर :** जरा मागें दृष्टी टाक कीं येईल तें माणूस तुझ्या दृष्टीसमोर.

**शरद :** [ मागें पाहून ] कोण ? मंदा ? अरे विसरलोंच मीं. माफ कर हं मंदा. [ मंदा ' चल् ' म्हणून मान उडविते. ] आतां मात्र जन्मांत विसरणार नाहीं तुला मी !

**प्रभाकर :** एखादी जन्माची आठवण देऊन ठेवलन् आहे कीं काय तिनं तुला ?

**शरद :** खुद्द स्वतःचीच !

**प्रभाकर :** [ आश्चर्यानें ] म्हणजे ?

**शरद :** म्हणजे असं कीं, आम्हीं लग्न करायचं ठरवलंय्.

**प्रभाकर :** खरं कीं काय ?–पण मंदा कबूल आहे ?

**शरद :** विचार कीं तिलाच.

**प्रभाकर** : मंदा, पुढं ये पाहूं–हा शरद काय म्हणतोय बघ.

**मन्दा०** : [ पुढं न येतां ] खरं तेंच म्हणतोय तो.

**प्रभाकर** : अस्सं ! फार आनंदाची गोष्ट आहे. [ थेोडं थांबून ]–पण तुझ्या नोकरीचं काय करणार आहेस तूं मंदा ?

**मन्दा०** : सोडून देणार आहें. कांहीं झालं तरी नोकरी करायची नाहीं असं ठरवलंय् मी.

**प्रभाकर** : काय नोकरी सोडणार तूं ? —लग्न करायचं म्हणून ?

**मन्दा०** : नोकरीचा कंटाळा आलाय् मला. [ प्रभाकर प्रभावतीकडे सूचकतेनें बघतो. दोघांची नजरानजर होते. प्रभावती दुसरीकडे नजर वळवते.]



## —२—

[ **स्थळ :** शरद–मंदाचे बिऱ्हाडांतील प्रशस्त खोली. तिन्ही दृश्य बाजूंस दरवाजे आहेत. उजव्या बाजूच्या दरवाज्यांतून आंत येतां येते. मागील बाजूचा दरवाजा एका लहानशा गच्चींत उघडतो, व डाव्या बाजूच्या दरवाज्यांतून आंतील खोलींत जाण्याचा रस्ता आहे. मागील बाजूच्या भिंतीस दरवाज्यालगत एक खिडकीही आहे. त्या खिडकीलगत एक खुर्ची–टेबल व टेबलाच्या दोन बाजूंस दोन बांकें मांडलेलीं आहेत. खोलींत इतरही कांहीं सामान–खुर्च्या, लहान स्टूल वगैरे–अव्यवस्थित पडलेलें आहे. मध्येंच “ शरच्चंद्र भालचंद्र गोखले, बी. ए. एल्. एल्. बी. वकील ” अशी इंग्रजी मराठी अक्षरें लिहिलेली एक पाटी आहे. आंगांत पातळ सद्रा व धोतर वर खोचलेलें, केंस अव्यवस्थित व घामट चेहरा असलेला शरद मध्यमागीं उभा आहे. ]

**शरद :** [ कमरेवर हात ठेवून खुर्ची–टेबल व बांकें यांजकडे पाहात ] हें ठीक जमलं ! आतां या खुर्च्या–या कुठं बरं ठेवाव्या ? [ एका बाजूला एक खुर्ची नेत ] अंहं, इथं नाहीं ठेवून उपयोग, आंत जायच्या वाटेंत येतील. हं,

इथं जागा मोकळी दिसते आहे. तिथं ठेवाव्या ह्या खुर्च्या. [ मागील बाजूस उजव्या हाताच्या कोपऱ्यांत खुर्च्या ठेवतो. ] वा ! छान ! [ हात झाडतो. ] जमला बेत न काय ! खोलीच्या मानानं फर्निचर हवं तेवढंच आहे ! अरेच्या, हें स्टूल राह्यलंच कीं ? हें ठेवावं इथं या कोपऱ्यांत खुर्च्यांजवळ. नाहींतर इथं टेबलाजवल बसायच्या खुर्चीजवळ ठेवावं; कामाचे कागद किंवा पाण्याचा तांब्या ठेवायला ठीक पडेल. त्यावर घालायला मंदाला एक जाळीचा रुमाल विणायला सांगितला पाहिजे. झालं फार्निचर लावून. आतां पाटी–[पाटी उचलून]— पण एकदां मंदाला दाखवलेलं बरं. [ डाव्या हाताच्या दरवाज्याशीं जाऊन ] मंदा, ए मंदा, [ आंतून 'काय' ] इकडे ये पाहूं जरा. [ आंतून 'आलें हं' ]

**मन्दा०** : [ बाहेर येत ] हं. कशाला बोलावलंस ?

( पदर कमरेला खोंचलेला, पातळ नवेंच पण मळलेलें. केंसांचा अंबाडा अर्धवट सुटलेला; त्यांतलें कांहीं केंस मान, गाल व कपाळ यांवर आलेले. चेहरा घामानें डबडबलेला असा तिचा अवतार आहे. )

**मन्दा०** : इश्श ! असा काय टक लावून बघत राह्यलास माझ्याकडे ? आज नवीन बघतोस कीं काय मला ?

**शरद** : खरंच आज नवीन बघतों आहें मी तुला. तूं आतां दिसते आहेस तशी आजपर्यंत बघितली नव्हती तुला. [ तिच्याजवळ जात ] किती छान दिसते आहेस आज तूं, मंदा !

**मन्दा०** : [ मागें होत ] पुरे, पुरे ! हेंच सांगायला बोलावलंस वाटतं मला ?

**शरद** : नाहीं. बोलावलं दुसऱ्याच कशाकरतां.–पण तूं समोर आलीस कीं दुसरं कांहीं सुचत नाहींसं होतं मला.

**मन्दा०** : पण काय रे शरद–[ एकदम लाजून जीभ चावते. ]

**शरद** : कायरे ! शरद ! वा ग वा. शाहणीच आहेस तूं ! दुसरं कुणी ऐकलं तर म्हणेल हा हिचा नवरा आहे कीं गडी आहे.

**मन्दा०** : इतके दिवसांचं तोंडांत बसलेलं एकदम जाणार आहे वाटतं ?

**शरद** : माझं नांव घेतलंस तें घेतलंस आणि वर अरेतुरे. हा माझा धडधडीत अपमान आहे.

**मन्दा० :** कळतंय मला. मला बोलावलंस कशाला तें सांग पाहूं ?

**शरद :** अगदीं साधेपणांतच बायका किती सुंदर दिसतात. बायका जर साध्याच वेषांत राहतील, तर पावडर, वेण्या, आंकडेकांटे, गंगावनं यांवर खर्च होणारा वेळ वांचून, तो वेळ इतर एखाद्या चांगल्या कामाकडे लावतां येईल.

**मन्दा० :** आणि हा तुझा अवेळीं उपदेश ऐकत बसण्यापेक्षां मी जर आंत कामाला गेलें तर हा जो माझा वेळ तूं घेत आहेस तो सार्थकी लागेल. [ आंत जाऊं लागते. ]

**शरद :** हें काय, थांबशील कीं नाहीं जरा ? मीं तुला कशाकरतां हांक मारली. [ डोकें खाजवतो. ]

**मन्दा० :** आठवलं कीं हांक मार हं मला. [ पुन्हां आंत जाऊं लागते ]

**शरद :** थांब, आठवलं. हें फर्निचर बघ कसं लावलं आहे तें ?

**मन्दा० :** बघूं [ कमरेवर हात ठेवून उभी राहते व पाहते आणि मोठ्यानें हंसतें. ]

**शरद :** [ ओशाळून ] म्हणजे ? हंसायला काय झालं ?

**मन्दा० :** हें वकिलाचं ऑफिस आहे कीं शाळा आहे ?–आणि तूं वकील आहेस कीं मास्तर आहेस ? [ शरदच्या हातांतील पाटी वाचून ] इश्श ! ती पाटी काय हातांत घेऊन उभा राह्यलायस ? तूं वकील आहेस हें माहीत आहे मला. गळ्यांत तरी घाल ती पाटी. [ तो चटकन् पाटी खालीं ठेवतो. ]

**शरद :** [ मोठ्यानें ] मंदे–[ ती त्याच आवाजांत ' ओ ' देते ] फाजीलपणा बंद कर आणि सांग पाहूं. मी—

**मन्दा० :** तूं ना ? वाईट आहेस अगदीं. [ शरद तिचा कान पकडण्याचा आविर्भाव करतो. ] नाहीं, नाहीं.–सांगूं ? तीं बाकं त्या दरवाज्याच्या दोन्ही बाजूंस ठेव. पक्षकार आले कीं त्यावर बसतील.–आणि त्या खुर्च्या टेबलासमोर ठेव. म्हणजे एकेकाला पुढं बोलावून त्यांच्याशीं बोलतां येईल.

**शरद :** खरंच कीं ! हें नाहीं माझ्या लक्षांत आलं !

**मन्दा :** कामांत लक्ष असेल तर ना.

**शरद :** तूं आंत असल्यावर माझं लक्ष बाहेर कसं लागेल ? ए, अशी मान नको उडवूंस. तुझ्याकडे म्हणजे तूं चहा करते आहेस कीं नाहीं, त्याकडे. तुझ्याकडे सारखं लक्ष लागून राहयला अशी काय मोठी रंभा–उर्वशी लागून राहयली आहेस ?

**मन्दा० :** [मान उडवून] माहीत आहे मला. मघांपासून एवढ्यातेवढ्या कारणावरून पंचवीस वेळां आंत आलास आणि शंभर वेळां बाहेर हांक मारलीस.

**शरद :** आणि तूंही आलीस. [दोघं हंसतात]

**मन्दा० :** बरं तें सांगितलं तसं कर पाहूं. मला अजून आंत खूप काम आहे. [आंत जाते. शरद तसाच थोडावेळ उभा राहतो. व नंतर पुन्हां मंदाकिनीला हांक मारतो.]

**मन्दा० :** [बाहेर येऊन] अजून काय राहयलं ?

**शरद :** हें पहा मंदा, सकाळपासून काम करून थकलोंय् अगदीं. हें आणा, तें आणा, असं करा, तसं करा, हें उचला, तें ठेवा; नुसते हुकुमावर हुकूम चाललें आहेत तुझें.

**मन्दा० :** असं रे काय शरद ? मला एकटीला एवढं सामान लावतां येईल वाटतं ?

**शरद :** नाहीं, तसं नाहीं म्हणत मी.–पण आतां झालं एवढं काम पुरे.

**मन्दा० :** अंहं. तसं कांहीं चालायचं नाहीं. आजच्या आज सामान लावून स्वैंपाक करायचा ठरवलंय् मी.

**शरद :** आजच कशाला ? सकाळपासून सारखी फिरते आहेस;–आणि खूप दमलीही आहेस. नाहींतर असं करूंया. एक गडी ठेवूंया.

**मन्दा० :** एवढ्याशा कामाला गडी कशाला पाहिजे ? तुझी वकिली नीट चालूं दे. मग गडी ठेव नाहींतर बाई ठेव—

**शरद :** बाई ठेवूं ?

**मन्दा० :** इश्श ! कांहीं वाटतं का मनाला ?

**शरद :** नाहीं. तूंच म्हणालीस म्हणून म्हटलं ! [ती 'चल' म्हणून मान उडवते] बरं राहयलं.–पण आतां एक कप चहा घेतल्याशिवाय आपल्याच्यांनीं नाहीं पुढं काम व्हायचं.

**मन्दा०** : माहीत आहे मला. चहाची व्यवस्था आंत करून आलें आहे मी.

**शरद** : तुला कसं समजलं आत्तां चहा लागेल हें ? मी नव्हतं सांगितलं.

**मन्दा०** : सांगायला कशाला पाहिजे ? आम्हांला एवढंसुद्धां समजत नाहीं वाटतं ?–पण पहा हं, चहा घेतल्यावर मग जर का अळंटळं केलीस कामांत तर मात्र–( हंसत हंसत आंत जाते. पाठीमागून शरदही जातो. रंगभूमीवर कोणीच नसते. पार्श्वसंगीतांतून निघणारे कोमल स्वर वातावरण आनंदी करीत आहेत. तें थांबतें व प्रभाकर बाहेरून आंत येतो. )

**प्रभाकर** : [ इकडे तिकडे बघून आपल्याशींच ] गेलीं कुठं हीं दोघं ? आंत आहेत कीं काय ? [ डाव्या हाताच्या दरवाज्याजवळ जाऊन ] शरद, ए मंदा—

**शरद** : [ बाहेर येत ] हॅलो, प्रभाकर, ये कीं. वास्तविक पाह्यलं तर तुला 'या बसा' असं बहुमानार्थी संबोधिलं पाह्यजे. कारण नात्यानं जरी मेव्हणा असलास तरी मानानें सासऱ्याच्या ठिकाणीं आहेस.

**प्रभाकर** : पण सांगतोय् कोण तुला, मला "अहो जाहो" म्हण म्हणून ?

**शरद** : थांब हं. [ दरवाज्याशीं जाऊन ] मंदा, एक कप चहा जास्त. प्रभाकर आलाय. चला प्रभाकर, आंतच बसूं. [ विचार करून ] नको, बाहेरच बसूं. कोण पसारा पडलाय सामानाचा आंत !

**प्रभाकर** : हें पहा शरद, मला आत्तां चहाची मुळींच जरूर नाहीं. मंदे—

**मन्दा०** : [ बाहेर येत ] काय रे दादा ?

**प्रभाकर** : हें बघ, जेवढा चहा तयार आहे, तेवढाच बाहेर घेऊन ये. पुरेल आपल्याला. मला जरा बोलायचंय तुमच्याशीं.

**मन्दा०** : होय ?–आलेंच हं. [ शरदला. ] तेवढ्या खुर्च्या व टीपॉय घे पुढं. ( ती आंत जाते. शरद–प्रभाकर खुर्च्या व टीपॉय पुढें आणून नीट मांडतात. मंदा चहाचा ट्रे घेऊन येते. तिघंही खुर्च्यांवर बसतात. मंदा कप भरूं लागते. )

**मन्दा०** : कशी काय आहे जागा दादा ?

**शरद** : तूंच पसंत केलीस तेव्हां ती चांगली असणारच.

**मन्दा०** : आम्हीं दोघांनीं पसंत केली आहे. [ चहाचा कप पुढें ठेवीत ] एकटाचसा आलास ?–वहिनी–मधूला घेऊन यायचं होतंस कीं.

**शरद्** : कशाला ? आपला हा अवतार दाखवायला ?

**प्रभाकर** : तुझी वहिनी आतां पूर्वीसारखी गुलाम राह्यली नाहीं. ती आतां स्वतंत्र स्त्री झालेली आहे. तिला वाटेल तेव्हां ती येईल. मधूविषयीं म्हणशील तर त्याला मीं मुद्दामच आणलं नाहीं. [ शरद-मंदा त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहतात. ] त्याच्या विषयींच मला तुमच्याशीं बोलायचं आहे. हें पहा. मधूला एखाद्या बोर्डिंगांत ठेवण्याचा मीं विचार केला आहे; आणि तेंही शक्य तितक्या लवकर.

**मन्दा** : कां ? त्याला बोर्डिंगांत नेऊन ठेवायचीशी वेळ आली ? –शिवाय तसं करायला वहिनी कबूल होईल असं नाहीं मला वाटत.

**प्रभाकर** : कशावरून म्हणतेस तूं हें ?

**मन्दा०** : दीड वर्षापूर्वी तो खूप आजारी होता. डॉक्टरचं त्याच्यावर सारखं लक्ष राहणं जरूर होतं; म्हणून डॉक्टरनींच त्याला स्वतःच्या हॉस्पिटल्मध्यें ठेवण्याचा तुम्हांला सल्ला दिला. त्यावेळीं वहिनीनें एक क्षणही त्याला दृष्टीआड करण्याचं नाकारलं होतं.

**प्रभाकर** : तुझी वहिनी आतां पूर्वीची राहिली नाहीं, हें मीं मघांशीं सांगितलंच आहे. माझी खात्री आहे कीं, मधूला बोर्डिंगांत ठेवायला ती तयार होईल.

**शरद्** : म्हणजे ? वहिनीला न विचारतांच तूं हें ठरवलं आहेस कीं काय ?

**प्रभाकर** : होय.–पण तिची संमति घेतल्याशिवाय मात्र तसं करणार नाहीं. तिची संमति मिळेल अशी खात्री आहे माझी.

**मन्दा०** : दादा, मधूला बोर्डिंगांत ठेवावं, असं तुला मनापासून वाटतं ?

**प्रभाकर** : मुळींच नाहीं. उलट तसं करण्यावांचून गत्यंतर नाहीं, हें मला ज्यावेळीं कळून आलं, तेव्हां माझ्या मनाला किती यातना झाल्या;–आणि अजूनही होत आहेत.

**मन्दा०** : मग त्याला कशाला घराबाहेर काढतो आहेस ?

**प्रभाकर :** मंदा, मधू अजून लहान आहे. आज त्याच्या मनावर जे संस्कार घडतील त्यावर त्याचं पुढील आयुष्य अवलंबून आहे. त्याच्या मनावर भलतेच संस्कार घडून त्याच्या पुढील आयुष्यावर त्याचा वाईट परिणाम व्हावा असं मला मुळींच वाटत नाहीं.

**मन्दा० :** म्हणजे ?–असं झालंय् तरी काय ?

**प्रभाकर :** तसं विशेष कांहीं नाहीं.–पण प्रभावती आणि मी –आमचं दोघांचं यापुढें नीट जमेल असं मला वाटत नाहीं. तिनं नोकरी करावी हें मला आवडत नाहीं; आणि हीच गोष्ट तिच्या आवडीची होऊन बसली आहे. साहजिकच याचा शेवट भांडणांत आणि बेबनावांत होणार. मधूच्यासमोर या गोष्टी घडायला नको आहेत. शिवाय त्याचं कांहींही नीट होत नाहीं. वेळेवर खायला प्यायलाही नीट मिळत नाहीं त्याला. गडीमाणसांवर घर आणि मुलं टाकून त्यांचं कधीं नीट होईल का ? अशा परिस्थितींत मधूला कुढत ठेवण्यापेक्षां, त्याला बोर्डिंगांत ठेवणं फार बरं असं मला वाटतं.

**मन्दा० :** बोर्डिंगांत राहणं मधूला फार जड जाईल, दादा. त्याला तुमचा–विशेषतः तुझा फारच लळा लागलेला आहे. तुमच्यावांचून त्याला तिथं मुळींच करमणार नाहीं.

**प्रभाकर :** इथं राहूनसुद्धां त्याचं तसंच होणार आहे. सबंध दिवस त्याला घरांत एकटं रहावं लागतं. बोर्डिंगांत इतर मुलांच्या संगतींत थोड्याच दिवसांनीं तो रमून जाईल. शिवाय बोर्डिंगची सोय गांवांतच असल्यामुळें मला त्याला भेटणंही सहज शक्य होईल.

**शरद :** मग असं कर, प्रभाकर. त्याला इथं आमच्याकडे आणून ठेव. त्याचं सर्व कांहीं यथास्थित होईल.

**प्रभाकर :** प्रथम तसंच करावं असा माझा विचार होता. पण नंतर तसं करणंही मला योग्य वाटलं नाहीं. स्पष्ट बोलतों म्हणून रागावूं नका. तुम्हीं दोघं तरुण आहांत; नुकतंच लग्न झालंय तुमचं. परस्परांचा निर्बंध सहवास अजून तुम्हांला घ्यावयाचा आहे. कर्तव्य बुद्धीनं जरी तुम्हीं त्याला ठेवून घेतलं तरी

तुम्हांला त्याची अडचण झाल्यावांचून राहणार नाहीं. ( तिघंही आपल्याशींच विचार करीत थोडावेळ स्तब्ध बसतात. )

**शरद :** प्रभाकर, वहिनींच्या नोकरीचा तूं उगीच बाऊ करतो आहेस झालं.

**प्रभाकर :** तुला खरंच तसं वाटतं, शरद ? आमच्या आजच्या आयुष्याची तुला कल्पना नाहीं म्हणूनच तूं असं म्हणूं शकतोस.

**शरद :** कल्पना नसली तरी मी ती करूं शकतों.

**प्रभाकर :** या गोष्टी अशा आहेत कीं प्रत्यक्ष अनुभवाशिवाय त्या कळायच्या नाहींत; कारण त्या प्रत्यक्ष दाखवितां येत नाहींत; अनुभवाला मात्र येतात. आतां हेंच पहाना. इराण्याच्या हॉटेलांत, मंदानं केलेल्या चहापेक्षां उत्तम चहा तुला मिळेल.–पण त्या चहांत तुला या चहाची गोडी वाटेल का ?–आणि इथं चहा करून दोघांनीं पिण्यापेक्षां, हॉटेलांत जाऊन तयार चहा पिणं मंदाला आवडेल का ?

**शरद :** तुझं म्हणणं मला एकदम कबूल आहे.–पण आपण आपल्या पुरताच विचार करतों आहोंत. अलीकडे स्त्रियांना, पुरुषांना चहा करून देण्यापेक्षां आणि संसार करण्यापेक्षां नोकरीच आवडते.

**प्रभाकर :** मुळींच नाहीं. शिवाय प्रेमाच्या गुलामगिरीपेक्षां पैशाच गुलाम होणं कांहीं स्त्रियांना आवडत असेल, मला मात्र मुळींच आवडत नाहीं.

**शरद :** हें झालं तुझं मत. पण प्रभावहिनीचं मत निराळं असलं तर ? हा प्रश्न सुटायचा कसा ?

**प्रभाकर :** आजचं आमचं यांत्रिक जीवन तिला खरोखरच पसंत पडत असेल असं मला नाहीं वाटत ! तसं असतं तर पूर्वींपेक्षांही ती आज जास्त सुखी असावयास पाहिजे होती. पूर्वीची तिची आनंदी व हंसरी मुद्रा आज कित्येक दिवसांत मला पाह्यला मिळाली नाहीं. तुला कदाचित् असं वाटेल कीं, तिनं नोकरी करणं मला आवडत नसल्यामुळं ती दुःखी होत असेल. पण तसं मुळींच नाहीं. एकटी असतांनाही ती त्रासलेली आणि खिन्न असते.

**शरद :** ती जर सुखी नाहीं, तर नोकरी कशाला करील ?

**प्रभाकर** : तिचं तिलाही या प्रश्नाचं उत्तर नाटस देतां येत नाहीं. कदाचित् आयुष्यांत रुचिपालट म्हणून असेल किंवा पैशाच्या लोभामुळं असेल.

**शरद्** : मग आहे त्या स्थितींत आनंद मानून राहणं तुला भाग आहे.

**प्रभाकर** : तुझं म्हणणं एकदम मान्य आहे. पण आजचं आमचं जीवन इतकं नीरस आणि बेचव होऊन गेलं आहे कीं, आहे त्या स्थितींत आनंद मानावा कीं, दुःख करीत बसावं हेंच मला समजत नाहीं. एका टांग्याला जुंपलेल्या दोन घोड्यांप्रमाणं आमची स्थिति झालेली आहे. संसाराच्या गाड्याला जुंपलों गेलों आहोंत म्हणूनच आमचा संबंध ! बाकी इतर सर्व व्यवहार एखाद्या 'आश्रमां'तल्याप्रमाणें चालले आहेत. सकाळीं उठतांच मी तोंड धुतों, ती तोंड धुते, मी दाढी, ती वेणीफणी करते. गड्यानं पाणी उपसून दिलं कीं, आंघोळी करतों. स्वैंपाकणीनं पानं वाढलीं कीं जेवतों आणि ऑफिसमध्यें जातों. पाठीमागं घाई लागल्यामुळं एकमेकांशीं दोन प्रेमाचे शब्दही बोलायला फुरसद मिळत नाहीं आम्हांला. संध्याकाळीं दोघंही दमून व त्रासून घरीं येतो. आणि दुसरी व्यक्ति त्रासलेली बघितली कीं, श्रमपरिहार होण्याऐवजीं आम्ही एकमेकांवर चिडतों आणि मग कसातरी वेळ दवडून जेऊन झोंपतों. परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचं सोनं होतं; पण दोन लोखंडाचे तुकडे एकमेकांवर आपटले कीं, त्यांतून कर्णकटू आवाजच निघावयाचा. असं नीरस व जिव्हाळा नसलेलं आमचं आयुष्य चाललेलं आहे.

**शरद्** : मला वाटतं या बाबतींत तूं थोडा धीर धरला पाहिजेस. माझी खात्री आहे कीं, पुढंमागं केव्हांतरी तिला नोकरीचा कंटाळा येईल किंवा नोकरींत वाईट अनुभव येतील, आणि मग ती नोकरी सोडतील.

**प्रभाकर** : तूं जबर आशावादी आहेस, शरद. मी तसा नाहीं.

**शरद्** : अत्यंत घोर निराशेंतही नवीन आशा निर्माण व्हावयास पाहिजेत. कित्येक वेळां केवळ आशाच माणसाचं जीवन जगविण्यास समर्थ ठरते. निव्वळ आशेवरच जग चाललेलं आहे. कित्येक वेळां घोर निराशेंतही जन्म पावणाऱ्या आशा सफल ठरत असतात. माझंच पहाना. दीड वर्षापूर्वी माझा अगदीं 'देवदास' झाला होता.—पण आज मी 'माणूस' म्हणून सुखांत पडलों आहें.

( शेवटचीं दोन वाक्यें शरद उच्चारीत असतां मंदा भराभर कपबशा गोळा करून ट्रे घेऊन आंत जाते. )

**प्रभाकर :** तुझी गोष्ट अगदीं निराळी होती. संसारसुखाच्या आशेनं कित्येक स्त्रिया नोकरीला कंटाळून लग्न करतात हें खरं.–पण आधींच संसारसुखाचा अनुभव घेतलेली प्रभा पुन्हां संसारांत पडेल हें कितपत शक्य आहे याची मला शंका वाटते. [ मंदा दरवाज्यांत येऊन क्षणभर उभी राहते व नंतर पुढें येते. ]

**शरद :** तें पुढचं पुढे. सध्यां तरी आल्या परिस्थितीला तुला तोंड दिलंच पाहिजे.

**प्रभाकर :** तें ओघानंच आलंय म्हणा. मनांत नसतांही मधूला बोर्डिंगांत ठेवायला तयार झालों तो यामुळेंच !

**मन्दा० :** दादा, या बाबतींत तूं एकदां वहिनीला विचारून पहाना.

**प्रभाकर :** तें काम मी तुझ्यावरच सोंपविणार आहें.

**मन्दा० :** मी विचारूं वहिनीला ? [ तो मानेनें ' होय ' म्हणतो ] मला वाटतं तूंच विचारावंस हें उत्तम. त्या निमित्तानं तरी तुझं आणि तिचं एकदां खुल्या मनानं बोलणं होईल.

**प्रभाकर :** मी मुद्दामच अशा बाबतींत तिच्याशीं बोलायचं टाळतोंय्. क्षुल्लकशा कारणावरून शब्दाला शब्द वाढणं आणि त्याचा शेवट भांडणांत होणं अगदीं नेहमींच होऊन बसलंय्.

**मन्दा० :** बरं पाहीन विचारून.

**प्रभाकर :** शक्य तितक्या लवकर तूं हें काम केलें पाहिजेस.

**मन्दा० :** त्याकरतां आजउद्यां भेटेन वहिनीला.

**प्रभाकर :** ठीक–हा प्रश्न एकदां सुटला कीं, त्याच्या बाबतींत फारशी काळजी करण्याचं कारण नाहीं. जाऊं मी आतां ?

**मन्दा० :** येत जा बरं का दादा नेहमीं.

**प्रभाकर :** हें कांहीं मला सांगायला नको. [प्रभाकर जातो.] (शरद–मंदा झाल्या प्रकाराचा विचार करीत स्तब्ध बसतात. पार्श्वसंगींतांतून निघणारे स्वर

वातावरण अधिकच उदास करीत आहेत. शरद–मंदा परस्परांकडे बघतात. काय करावें काय बोलावें हें त्यांना समजत नाहीं.)

**मन्दा०** : [ एक निश्वास टाकून ] दादाच्या संसाराची विस्कटलेली घडी पुन्हां नीट केव्हां बसेल कुणास ठाऊक !

**शरद** : दोघांपैकीं एक पड खाईतोंपर्यंत हें असंच चालणार. [ दोघेही पुन्हां स्तब्ध बसतात. शेजारच्या बिऱ्हाडांत कुणीतरी सारंगीवर करुणगीत गात आहे तें त्यांस ऐकूं येत आहे. ]

**मन्दा०** : [ गाणें संपल्यावर ] यापुढें काम होईल असं नाहीं मला वाटत. डबा सांगून ये खानावळींत.

**शरद** : बरं, बरं. आत्तांच सांगून आलं पाह्यजे. [ धोतर नीट करीत आंत जातो व शर्ट घालून बाहेर येतो. ] उगीच विचार करून डोक्याला त्रास नको हं करून घेऊंस. [ जातो. मंदा हातावर डोकें टेंकून स्तब्ध बसलेली असते. एकदोन मिनिटांनीं गिरजा येते. ]

**गिरजा** : मंदाताई—

**मन्दा०** : [ पाहून ] गिरजा ! ये ना आंत.

**गिरजा** : नाहीं. म्हटलं ताईसाहेबांचा संसार पाहून यावं.

**मन्दा०** : अस्सं होय ?–पण सामानसुमान सर्व कांहीं लावायचं आहे अजून.

**गिरजा** : म्हणून तर आलें.

**मन्दा०** : नको नको. आमचं सामान कांहीं फार नाहीं; लावूं आम्हीच, सवडीनं. –शिवाय दादाचं घर तुझ्यावरच आहे. तिथलं सर्व कांहीं तुलाच बघावं लागतं.

**गिरजा** : तर काय ? वहिनीबाई कांहीं म्हणतां कांहीं बघत नाहींत.

**मन्दा** : नीट करीत जा हं सगळं. जन्माचं कल्याण होईल बघ तुझं.

**गिरजा** : मंदाताई, वहिनीबाई आणि दादा अलीकडे—

**मन्दा** : [ चटकन् तिला आवरीत ] बरं बरं ! आपल्याला काय करायचंय् त्याच्याशीं ? आपण आपलं काम नीट करावं म्हणजे झालं.

**गिरजा** : तें तर चाललंच आहे कीं ! ताई, तुम्हांला हवी असेलच मोलकरीण ?

**मन्दा :** धुणींभांडीं करण्यापुरताच गडी ठेवणार आहें मी.

**गिरजा :** गडी कशाला ? माझ्या गांवची एक गरीब बाई आहे—

**मन्दा :** लग्न झालं आहे तिचं ?

**गिरजा :** तर ! लग्न झालं म्हणून तर गांवाहून इकडं आली.

**मन्दा :** मग तिला तिचा संसार नाहीं वाटतं ?

**गिरजा :** तुमच्यासारखं आम्हांला फक्त संसाराकडेच लक्ष देऊन भागत नाहीं, मंदाताई.–तुमच्या धन्यासारखें आमच्या धन्यांना नाहीं पैसे मिळत. संसार चालवायला, आमच्या धन्यांना आम्हांला कामधंदा करून मदत करावी लागते; तेव्हां कुठं पोटभर भाकरी मिळते. आम्हांला काय तुमच्यासारखा संसार करायची हौस नाहीं ? आमच्या गरिबीमुळें आम्हांला कामधंदा करावाच लागतो. उगाच नाहीं आम्ही घरं आणि पोरबाळं टाकून बाहेर पडत.

**मन्दा० :** खरं आहे, तुझं म्हणणं. घेऊन ये तुझ्या गांववालीला उद्यां. ( गिरजा ' बरं ' म्हणून जाते. दारांतच तिची आंत येणाऱ्या प्रभावतीची गांठ पडते. प्रभावती तिच्याकडे रोखून पाहते. गिरजा मुकाट्यानें निघून जाते.)

**मन्दा० :** वहिनी, ये ना. [ प्रभावती आंत येते. ]

**प्रभावती :** गिरजा आली होती वाटतं ? [ संशयानें तिच्याकडे बघते. ]

**मन्दा० :** हं. तिची एक गांववाली मोलकरीण आहे. आमचं काम तिला मिळेल का म्हणून विचारायला आली होती.

**प्रभावती :** अस्सं ! मला वाटतं त्यांचा कांहीं निरोप घेऊन आली होती. [ ' निरोप ' शब्दावर जोर देऊन. ]

**मन्दा० :** [ आश्चर्यानं ] वहिनी— !

**प्रभावती :** कां ? आश्चर्य वाटलं मी असं बोललें म्हणून ?

**मन्दा० :** आश्चर्य नाहीं. पण वाईट मात्र वाटलं.

**प्रभावती :** तुला वाईट वाटणं साहजिकच आहे. किती झालं तरी भावाचं नातं आहे.

**मन्दा० :** आणि तुझा कोणी नाहीं वाटतं ?

**प्रभावती :** त्यांचं माझं नातं कसं विसरेन मी ?—आणि तेही विसरले नाहींत. अलीकडे तर आपलं नातं ते कसोशीनें पाळीत असतात.

**मन्दा० :** अशी ग काय बोलतेस ? तो तुझा शत्रू आहे वाटतं ?

**प्रभावती :** मी मात्र अलीकडे त्यांना शत्रूसारखी वाटते आहे.

**मन्दा० :** [ सहानुभूतीनें ] वहिनी, तुझी प्रकृती बरी नाहीं; तुला कांहीं होतंय का ?

**प्रभावती :** कांहीं होत नाहीं मला.—आणि कांहींही झालं तरी कुणालाही त्याची पर्वा नाहीं.

**मन्दा० :** वहिनी, बस पाहूं इथं. [ तिचा हात धरून तिला एका खुर्चीवर बसवते; व हातांतील छत्री व मनीबॅग घेऊन टेबलावर ठेवते. ] वहिनी, चहा घेशील का थोडा ?—हुशारी वाटेल बघ.

**प्रभावती :** नको.—खरंच नको, मंदा. तूं बस इथं. मला तुझ्याशीं खूप बोलायचं आहे; म्हणून मी मुद्दाम तुझ्याकडे आलें आहें. तुला बरंच काम आहे हें दिसतंय मला.—पण माझ्यासाठीं ठेवशील ना बाजूला ?

**मन्दा० :** वहिनी, अशी ग काय तिऱ्हाइतासारखी बोलते आहेस ? दादाचं अन् तुझं लग्न झालं आणि तूं आमच्याजवळ राहायला आलीस; तेव्हांपासून तूं मला पाठच्या बहिणीप्रमाणं वागवलंस, नणंदा-भावजयीचं नातं आपलं नांवालच. —कुणालाही वाटायचं नाहीं आपण नणंदा-भावजया आहोंत म्हणून. माझ्यावर तुझा कांहींच हक्क नाहीं वाटतं ?

**प्रभावती :** मंदा, माझी हक्काचीं माणसं मला अलीकडे दुरावलीं आहेत.

**मन्दा० :** असं कसं होईल, वहिनी ? किती झालं तरी आपलीं माणसं आहेत. रागावली-बोलली तरी अंतःकरणांतलं प्रेम नाहींसं होत नाहीं.

**प्रभावती :** पण रागावणं-बोलणं नेहमींचंच होऊन बसल्यावर अंतःकरणांत प्रेम असून त्याचा उपयोग काय ? बरणींत ठेवलेला मुरंबा नुसता त्याकडे पाहून किंवा तो तेथें आहे म्हणून कोणाचंही समाधान होत नाहीं. आकाशांत ढग आल्यावर त्याच्याआड सूर्य असूनसुद्धां वातावण कुंद झाल्याशिवाय रहात

नाहीं. तें नाहींसं व्हायला चक्क ऊन्हंच पडलं पाहिजे. (दोघीही थोडावेळ स्तब्ध बसतात)

**मन्दा०** : वहिनी, हल्लींच्या इतकी उदास आणि खिन्न अशी मीं तुला कधींच पाहिली नव्हती. नोकरींत तुला कांहींतरी त्रास खास होत असला पाहिजे. [ जरा थांबून ] वहिनी, मला वाटतं तुला नोकरी झेंपत नाहीं.

**प्रभावती** : चुकीची समजूत आहे तुझी, मंदा. नोकरीच्या बाबतींत मी भाग्यवान आहें. सुदैवानं विलासरावांसारखे वरिष्ठ मला मिळाले आहेत. कामाचा त्रास मला होऊं नये, म्हणून त्यांची नेहमीं खटपट चालू असते.

**मन्दा०** : मग तूं तर पूर्वींपेक्षांही जास्त सुखी असावयास पाहिजे होतीस ?

**प्रभावती** : खरं आहे तुझं म्हणणं.–पण तसं झालं नाहीं एवढं मात्र खरं. दोन प्रकारच्या सुखांचं कधीं पटतच नाहीं कीं काय कुणास ठाउक ? नोकरीपैशाचं सुख मला मिळालं; पण त्याच्या मोबदल्यांत संसाराचं सुख मला गमवावं लागलं.

**मन्दा०** : वहिनी, नुकताच मी एक इंग्रजी चित्रपट पाहिला.–नांव नाहीं आठवत त्याचं आतां;—त्या चित्रपटांत एका स्त्रीनं 'इन्डोअर' (Indoor) आणि 'आऊटडोअर' (Out door) अशा दोन्हीं परस्परभिन्न आयुष्याचा अनुभव घेतला. त्यानंतर तिला आढळून आलं कीं, संसाराचं सुख हवं असेल तर घराबाहेर पडतां कामा नये; आणि घराबाहेरचं सुख हवं असेल तर संसारसुखाची आशा सोडून दिली पाहिजे. संसारसुखं आणि इतर बाह्यसुखं ही एकाच वेळीं एकाच व्यक्तीला मिळणं अशक्य आहे;–फक्त स्त्रीलाच नव्हे तर पुरुषालाही हीं दोन्हीं सुखं एकाच वेळीं मिळूं शकत नाहींत, हें त्या चित्रपटांत मोठ्या कुशलतेनं दाखविलं होतं. मलाही तोच अनुभव आला; तुलाही येत आहे; आणि कदाचित् दादालाही तसाच अनुभव येत असावा.

**प्रभावती** : मंदा, तूं म्हणतेस तसा अनुभव मला येत आहे हें खरं आहे. —पण अशा अनुभवाचं कारण मात्र मनुष्यस्वभावच आहे.

**मन्दा०** : कुणाविषयीं बोलते आहेस तूं हें वहिनी ?

**प्रभावती** : तुझ्या दादाबद्दल ! मी स्पष्टच सांगतें. माझं संसारसुख नष्ट व्हायला तुझे दादाच कारण आहेत.

**मन्दा०** : असं कसं म्हणतेस वहिनी, तूं ? दादाला सुख काय नकोसं झालं आहे वाटतं ?

**प्रभावती** : मिळत असलेल्या सुखाचा त्यांना आतां कंटाळा आलाय्. म्हणून तें घ्यायचं नाहीं असं ठरवलंय् त्यांनीं.

**मन्दा०** : नवलाचीच गोष्ट सांगते आहेस तूं.

**प्रभावती** : नवल वाटण्यासारखीच गोष्ट आहे ही. घरांत पैसा भरपूर आहे; गडी-माणंसं आहेत, सर्व कांहीं यथास्थित आहे; मी आहें, मधू आहे, आणखी काय पाह्यजे आहे त्यांना ? —पण हें सुखच त्यांना खुपतं आहे. जेव्हां पहावं तेव्हां त्रासलेले अन् चिडलेले.

**मन्दा०** : दादाच्या तशा वागण्याला कांहींतरी कारण असलंच पाह्यजे.

**प्रभावती** : माझी नोकरी हेंच त्याचं कारण ? मी नोकरी करतें हें आवडत नाहीं त्यांना.

**मन्दा०** : पण तूं नोकरी धरलीस ती त्याच्याच संमतीनं ?

**प्रभावती** : होय;—पण तो जुलमाचा रामराम होता; त्यांना त्यावेळीं नोकरी नव्हती, म्हणून दिली संमति. आतां गरज सरली आहे.

**मन्दा०** : वहिनी, त्याला जर तूं नोकरी केलेली आवडत नाहीं, तर तुझा तरी एवढा आग्रह कां ? नोकरी केल्यानं तुला सुख लाभत नाहीं हें आतां तूंच कबूल केलंस.

**प्रभावती** : पण मीं नोकरी केली म्हणून बिघडलं कुठं ? जास्त पैसा घरांत येतो आहे; उद्यां वेळ पडली तर आपल्याच उपयोगी पडणार आहे.

**मन्दा०** : तें खरं वहिनी; पण त्यामुळं तुझं संसारसुख नष्ट होत आहे याची वाट काय ? —दादाचंही म्हणणं तेंच आहे.

**प्रभावती** : ते या बाबतींत तुझ्याशीं बोलले वाटतं ?

**मन्दा०** : होय. सुखाच्या बाबतींत त्याचंही म्हणणं तुझ्यासारखंच आहे.

**प्रभावती** : त्यांत कांहीं नवीन नाहीं. गेले सहा महिने रोज ऐकतें आहें तें !

**मन्दा०** : असं म्हणून कसं चालेल, वहिनी ? तुमचीं दोघांचीं सुखदुःखं एकमेकांशीं बांधलीं गेलीं आहेत.—शिवाय मधूचाही विचार तुम्हांला केलाच पाहिजे.

**प्रभावती :** तें मला कळत नाहीं वाटतं ? त्याकरतांच तर मी तुझ्याकडे आलें आहें.

**मन्दा० :** म्हणजे ?

**प्रभावती :** मधूला एखाद्या शाळेच्या बोर्डिंगांत ठेवावा असं मला वाटतं.

**मन्दा० :** ( आश्चर्यानें ) तुलाही तसं वाटतं, वहिनी ?

**प्रभावती :** मलाही ? –म्हणजे आणखी कुणाला वाटतं असं ?

**मन्दा० :** होय वहिनी–तूं यायच्या पूर्वी दादा आला होता इथं.

**प्रभावती :** मला वाटलंच ! काय म्हणत होते ते ?

**मन्दा० :** विशेष कांहीं नाहीं. तूं सांगितलंस तेंच.

**प्रभावती :** मधूला बोर्डिंगांत ठेवण्यासंबंधीं ?

**मन्दा० :** होय.

**प्रभावती :** मधूला बोर्डिंगांत ठेवायला ते तयार होतील असं वाटलं नव्हतं मला.

**मन्दा० :** केवळ नाइलाज म्हणून झालाय कबूल. मधूला दूर ठेवणं फारच जड जाणार आहे त्याला.

**प्रभावती :** कांहीं नाहीं जाणार !–उलट अडचण झाली आहे त्यांना त्याची.

**मन्दा० :** वहिनी काय बोलतेस तूं हें ?

**प्रभावती :** खरं तेंच बोलतें आहें.

**मन्दा० :** दादाला मधू किती जीव कीं प्राण आहे, हें मी प्रत्यक्ष पाहिलं आहे.

**प्रभावती :** पूर्वी तसं होतं–मी आजची स्थिति सांगतें आहें.

**मन्दा० :** तुझं अन् दादाचं बरंच बिनसलेलं दिसतंय् ?

**प्रभावती :** मी उगीच नाहीं बोलत असं. मधूशीं ते पूर्वींप्रमाणें हंसून–खेळून वागत नाहींत; एवढंच नव्हे तर संध्याकाळीं ऑफिसमधून घरीं आल्यावर त्याला फिराय्लाही नेत नाहींत. मला वेळ होत नाहीं म्हणून त्याला एकट्याला न्यायला कांहींच हरकत नाहीं. उलट ऑफिस सुटल्याबरोबर घरीं येणं त्यानीं वर्ज्य केलंय्. रात्रीं वाटेल तेव्हां परत येतात. कधीं कधीं जेवणखाणही

बाहेरच होतं. मी तर त्यांना नकोशी झालेंच आहें. आतां मधूचाही ओढा वाटत नाहीं त्यांना.

**मन्दा० :** वहिनी, नोकरीमुळं तुला सुख मिळत नाहीं. हें तूंच कबूल केलं आहेस. मग वहिनी, नोकरी सोडून पूर्वीप्रमाणं संसारांत कां रमत नाहींस ? सुदैवानं तुला दादासारखा नवरा मिळाला आहे. व्यसनी, व्यगी किंवा संसाराला नालायक नवरा असता तर मी आपण होऊन तुला नोकरी करण्यास सांगितलं असतं. दादा तसा नाहीं. तुला कधींही तो दुखवीत नाहीं. उलट, सर्वस्वी तुझ्या सल्ल्यानें वागत होता. तुमचा सोन्यासारखा संसार पाहून माझी चूक मला कळून येऊन, मला संसारांत पडण्याची इच्छा झाली. वहिनी, काय कमी होतं पूर्वी तुला ? म्हणून नोकरी करण्याचा हट्ट तूं चालविलास ? दे ना नोकरी सोडून.

**प्रभावती :** पण इतकी चांगली नोकरी सोडून कशाला द्यायची ? शिवाय मला पगारही आतां वाढला आहे. तुला माहीत नाहीं, मंदा. तुझ्या दादानं असं वागण्याचं कारण माझी नोकरी नव्हे. त्यांना माझा–संसाराचाच कंटाळा आला आहे.

**मन्दा० :** वहिनी. तुला राग आला तरी चालेल, पण यापुढं तुझ्या एकाही शब्दावर विश्वास ठेवायला मी तयार नाहीं.

**प्रभावती :** [ रागानें ] कशाला ठेवशील माझ्यावर विश्वास तूं ? किती झालं तरी बहीण आहेस तूं त्यांची. त्यांच्या दुर्गुणांवर तुला पांघरूण घातलंच पाहिजे.

**मन्दा० :** तूं जरी आणखी रागावलीस आणि दादाला नांवं ठेवलींस तरी दादाच्या चांगुलपणाबद्दल माझ्या मनांत केव्हांही संशय उत्पन्न होणार नाहीं.

**प्रभावती :** ते हल्लीं दुसऱ्या एका बाईच्या नादीं लागले आहेत असं सांगितलं तरीसुद्धां ?

**मन्दा० :** [ तिच्या दंडाला धरून ] काय ? काय म्हणालीस तूं ?

**प्रभावती :** खरं तेंच सांगतं आहें. लग्न होऊन तुम्ही बाहेरगांवीं गेलांत म्हणून तुमच्या लक्षांत आलं नाहीं तें. मला नोकरी लावून देणारी माझी बालमैत्रीण कमल हल्लीं त्यांच्याच ऑफिसांत नोकरीला आहे आणि तिच्याच—

**मन्दा० :** [कानावर हात ठेवून] पुरे, पुरे, पुढें सांगूं नकोस मला कांहीं.

**प्रभावती :** [खुनशीपणानें हंसून] तुझ्या दादांच्या सद्गुणांतला हा एक सद्गुण.–

**मन्दा० :** वहिनी, तूं जा पाहूं आत्तांच्या आत्तां. माझ्या तोंडांतून तुझ्याविषयीं वाईट शब्द पडतील अशी मला भीति वाटते.

**प्रभावती :** म्हणजे ? तरीसुद्धां मीच वाईट वाटतं ?

**मन्दा० :** [चिडून तिच्या आंगावर जात] हो ! हो !! हो !!! दादाला घराबाहेर काढायला तूंच कारण आहेस. घरांतल्या सुखाला पारखा झाल्यावर तो तरी दुसरं काय करणार ? स्वतःचा सोन्याचा संसार उधळून लावून माझ्या दादाचा तूं जन्माचा नाश केला आहेस. जा तूं इथून. माझ्यासमोर तूं उभीही राहूं नकोस. [ती न जातां तशीच कुऱ्यानें उभी आहे. असं पाहून] जा, जा म्हणतेना. [एकदम तिच्या आंगावर जाते. मंदाचं तें रौद्ररूप पाहून, एकएक पाऊल मागें घेत प्रभावती जाते. हताश होऊन मंदा धप्पकन् खुर्चींत बसते. आणि त्याच वेळीं पार्श्वसंगीतांतून कठोर स्वर बाहेर पडतात.]



## —३—

[ **स्थळ**:—पहिल्या अंकांतलें. बाहेरून आंत यावयाचा दरवाजा अर्धवट बंद आहे. आरामखुर्चीवर प्रभाकर पडलेला असून जवळच एका खुर्चीवर कमल बसली आहे. पडदा उघडतो. त्यावेळीं घड्याळांत सहाचे टोके पडत असतात. ]

**प्रभाकर** : [ खुर्चीत उठून बसत ] बापरे, सहा वाजले कीं ! किती चटकन् वेळ गेला. म्हटलं सुटीचा दिवस घरांत एकटं बसून कंटाळवाणा जाणार कीं काय ?—पण तुम्ही आल्यामुळं वेळ किती मजेंत गेला.

**कमल** : मी तरी एकटी घरीं बसून काय करणार होते म्हणा ! मला तरी बोलायचालायला पाहिजेच होतं कुणीतरी. आजची सुटी अगदीं अचानक मिळाली नाहीं ?

**प्रभाकर** : हो ना. मॅनेजरच मेला मग ऑफिसला सुटी न देऊन कसं भागेल ? कित्येक बाबतींत मोठी माणसंही लहान मुलांप्रमाणें वागतात असं कुणींसं म्हटलं आहे तें कांहीं खोटं नाहीं. लहानपणीं कुणीतरी मरून शाळेला

सुटीं झाली कीं, जसा आनंद होई तसाच आनंद आजही आपल्याला होतो नाहीं कां ? ( दार वाजते. दोघंही तिकडे बघतात. गिरजा दार उघडून आंत येते व त्या दोघांकडे पाहत आंत जाते. ) आज तुम्हांला फिरायला नाहीं वाटतं जायचं ?

**कमल :** तुम्ही येत असाल तर जाऊं या.

**प्रभाकर :** अंहं नको. तुम्हांला जायला माझी मुळींच हरकत नाहीं.

**कमल :** यावेळीं मला चहाचीं अतिशय गरज आहे.

**प्रभाकर :** आपला चहा झाल्याला अजून एक तासही उलटला नसेल. आतां पुन्हां काकूंना करायला सांगणं म्हणजे–जरा—

**कमल :** हें पहा जोग, तुमच्या मनांतून मी आतां जावं असं आहे हें कळतंय मला.

**प्रभाकर :** तुम्ही म्हणतां तें खरं आहे. तुम्हीं आत्तांच्या आत्तां निघून जावं असं मला खरोखरच वाटतं. आमची सौभाग्यवती यायची वेळ झाली आहे. कोणत्याही क्षणाला ती इथं येईल. तिच्या दृष्टीस आपण एकत्र न पडणं बरं.

**कमल :** कां ? तिची भीति वाटतें कीं काय तुम्हांला ?

**प्रभाकर :** तिला भीत नाहीं मी.–पण भांडणाला अगदी कंटाळलोंय मी.

**कमल :** मला एकदां ऐकायचंय ती काय म्हणते तें.

**प्रभाकर :** म्हणजे ? ती येईपर्यंत तुम्ही इथं बसणार आहांत कीं काय ?

**कमल :** काय हरकत आहे ? माझी लहानपणापासूनची मैत्रिण आहे ती ! आलेंच आहे तिच्या घरीं, तर तिला भेटल्याशिवाय जाऊं होय ?

**प्रभाकर :** मैत्रीण कीं वैरीण ? ती तर तुम्हांला वैरीणच समजते.

**कमल :** एवढा माझा तिटकारा करते ती ?

**प्रभाकर :** तिटकारा ? तुमचं नांवसुद्धां काढायची सोय नाहीं तिच्यापुढं !

**कमल :** मग ती येईपर्यंत मला इथं थांबलंच पाहिजे.

**प्रभाकर :** कशाला ? तिची बोलणीं ऐकायला ? कमलाबाई, तुमच्याविषयीं मला इतका आदर वाटतो कीं, गैरसमजुतीनें का होईना, पण तिनं तुम्हांला वाईट शब्द बोलावे असं मला नाहीं वाटत ? मला नाहीं आवडायचं तें.

**कमल :** पण मला आवडेल तें !

**प्रभाकर :** मर्जी तुमची ! मीच जातों बाहेर, म्हणजे मला तरी त्यामुळं वाईट वाटायला नको.

**कमल :** अहं–तुम्हींही इथंच बसलं पाहिजे. तिनं मला व तुम्हांला एकत्र पाह्यलं पाहिजे.

**प्रभाकर :** कमलबाई—

**कमल :** रागावूं नका. शेवटीं तुमच्या हिताचंच होणार आहे तें.

**प्रभाकर :** आगींत आणखी तेल ओतणं हिताचं असतं वाटतं ?

**कमल :** निदान या बाबतींत तरी ठरणार आहे तसं.

**प्रभाकर :** आश्चर्य आहे ! कसं तें तरी सांगाल ?

**कमल :** अंहं–तें आधीं नाहीं सांगायचं,–आणि सांगितलं तरी पुरुषांना तें कळायचं नाहीं. मी आज एक प्रयोग करून पाहणार आहें. आज सकाळींच माझ्या मनांत एक कल्पना आली. कदाचित् माझा प्रयोग यशस्वी होईल आणि प्रभा नोकरी सोडून पुन्हां संसारांत रमेल. खात्री नाहीं देतां येत तशी. नाहींतर पाठीमागून म्हणाल. तुमचा विश्वास आहे ना माझ्यावर ?

**प्रभाकर :** पूर्णपणें.

**कमल :** मग आपल्याविषयीं प्रभावतीनं जी गैरसमजूत करून घेतली आहे, ती तशीच कायम ठेवायची; आणि—( प्रभावती दरवाजा उघडून आंत येते. प्रभाकर–कमलला एके ठिकाणीं पाहून तिचा चेहरा रागानें लाल होतो. ती तशीच त्या दोघांकडे पाहात उभी राहते. )

**कमल :** [ कांहींतरी बोलले पाहिजे म्हणून हंसत ] आत्तांच येत आहेस वाटतं, प्रभा ?

**प्रभावती :** कां ? अडचण झाली कीं काय तुम्हांला ?

**कमल :** तुझ्याइथं माझं येणं तुला आवडलं नाहींसं दिसतं. मी जातेच आपली.

**प्रभावती :** कमल, माझ्या घरांत येण्याची मीं तुला पूर्वींच बंदी केली असतांही आज तूं इथं आलीस; बरीच धाडसी आहेस तूं. बाकी तुझ्यासारख्यांना लोकांचीं घरं आपलींच वाटायचीं.

**कमल :** आधीं आपण आपलं घर उघडं टाकायचं आणि त्यांत कुणी शिरलं कीं ओरडत बसायचं! त्यापेक्षां आपल्या घराचा बंदोबस्त नीट ठेवला तर चांगलं नाहीं का?

**प्रभावती :** पण स्वतःच्या घराचा नाहीं पत्ता; दुसऱ्याच्या घराची उठाठेव तुला कशाला?

**प्रभाकर :** कमलाबाई माझ्याकडे आल्या आहेत; त्यांना वाकडंतिकडं बोललेलं मला खपायचं नाहीं.

**कमल :** [हंसत प्रभाकरास] तुम्ही कशाला माझी कड घेऊन बोलतां? मी आहें कीं समर्थ उत्तर द्यायला. [प्रभावतीस] हं, काय म्हणतेस तूं?

**प्रभावती :** तुझ्याशीं एक शब्दही बोलण्याची माझी इच्छा नाहीं. माझी बालमैत्रिण म्हणून तुला घरांत आणलं तर मलाच घराबाहेर काढण्याचं तूं ठरवते आहेस. माझ्या केंसानं गळा कापलास तूं! जा, चालती हो इथून. आणि पुन्हां माझ्या घरांत पाऊल टाकूं नकोस. स्वतः संसारांत पडली नाहींस ती अशी दुसऱ्याच्या संसाराला आग लावण्यासाठींच नाहीं? म्हणे, मी स्वतंत्र वृत्तीची आहें! तुझी स्वतंत्र वृत्ति कळली मला. चार घरं हिंडायला पाहिजेत; एका घरांत कसं चैन पडणार तुला? किती निर्लज्ज आहे पहा. मी हांकलते आहे तरी कोडग्यासारखी हंसत उभी आहे तिथं!

**कमल :** तुझं बोलणं पुरे झालं कीं चाललेंच मी.

**प्रभावती :** जा. चालती हो.

**कमल :** ठीक आहे. जाते हं. येईन पुन्हां केव्हांतरी. [प्रभाकरास] जाते हं. (त्याला 'आहे तसंच चालूं दे' अशी खूण करीत निघून जाते.)

**प्रभावती :** [थोड्या वेळानें] तुम्ही नाहीं गेलात तिच्या मागोमाग? जातांना खूण करून गेलीच आहे ती.

**प्रभाकर :** नाहीं गेलों झालं. दुपारपासून इथंच होती ती.

**प्रभावती :** [एकदम] तुमच्या मनाला कांहींच कसं वाटत नाहीं ? मनाची नाहीं तरी निदान जनाची लाज बाळगावी. इतके दिवस बाहेर वाटेल ते खेळ केलेत,–आतां तिला घरांत आणायला सुरवात केली आहे. गडीमाणसं, आजूबाजूचों लोकं काय म्हणतील याचा विचार कधींतरी केला आहे तुम्हीं ?

**प्रभाकर :** माझ्या वागण्यासंबंधीं लोकांना काय वाटतं हें पाह्यची मला काय जरूर ? मी घालतों कुणाच्या भानगडींत लक्ष ?–आणि तुला तरी एवढं चिडण्यासारखं काय झालं आहे ? तुझं सर्व कांहीं यथास्थित चाललं आहे. नोकरी आहे, पैसा आहे, लागेल ती जिन्नस तुला आणतां येते. एवढंच नव्हे तर, चार पैसे शिल्लक ठेवतां येतात तुला. सुखाची नोकरी आहे शिवाय तुझा पगारही अलीकडे वाढलेला आहे.–काय कमी आहे तुला ?

**प्रभावती :** [चिडून] मी तुमची लग्नाची बायको आहे. वाटेल ते चाळे करायला तुम्हीं स्वतंत्र नाहीं. तुम्हांला वाटत असेल कीं, तुमची बायको तुमचं वाटेल तसं वागणं सहन करील किंवा मुळुंमुळुं रडत बसेल. तुम्हांला बजावून ठेवतें, मी जिवंत असतांना तुमचे वाटेल ते चाळे मुळींच सहन करणार नाहीं; किंवा चालूंही देणार नाहीं.

**प्रभाकर :** [उपरोधिकपणें] तूं माझी लग्नाची बायको आहेस हें मला नाकबूल करतां येणं शक्य नाहीं; हो. लग्नच लागलंय ना आपलं ! वाटेल तें करायला मी स्वतंत्र नाहीं हें खरं !–पण तें स्वातंत्र्य मीं घेतलं तर तूं काय करणार आहेस ? मीं केलेले चाळे तूं सहन करणार नाहींस हेंही मला कबूल आहे. कारण तुझ्या इच्छेला येईल तें करायला तूं माझी पर्वा बाळगणार नाहींस हें माहीत आहे मला. तूं म्हणतेस तें सर्व मला कबूल असतांना, तेंच बोलून दाखविण्यांत काय अर्थ आहे ? मला सर्व कांहीं माहीत आहे.

**प्रभावती :** नुसतं माहीत असून उपयोग काय ? त्याप्रमाणं वागलं पाहिजे. ( थोडावेळ आपल्याशींच धुसफुसत उभी राहते. प्रभाकर जणू काय कांहींच झालं नाहीं अशी मुद्रा करून उभा असतो. ) स्वतःची बायको तुम्हांला वैरीण वाटायला लागली; जीव कीं प्राण असलेल्या मुलाला बोर्डिंगांत ठेवण्यापर्यंत

तुमची मजल गेली. संसारांत मन नाहीं; घरांत लक्ष नाहीं;–आणि वर त्या मैनेच्या नादीं लागलात. काय सुख वाटतं तुम्हांला असें वागण्यांत ?

**प्रभाकर :** परिस्थितीप्रमाणें माणसाच्या मनांत बदल होतो, त्याप्रमाणें त्याच्या सुखाच्या कल्पनेंतही होतो.

**प्रभावती :** परिस्थिति ! काय वाईट चाललंय् हो तुमचं ? परिस्थितींत काय अशी उलथापालथ झाली आहे ? घर आहे, बायको आहे, मुलगा आहे, पैसा आहे ! दुसऱ्या कुणी आजची परिस्थिति पाहिली तर तुमचा हेवा वाटेल त्याला !

**प्रभाकर :** दुरून डोंगर नेहमींच साजरे दिसतात.

**प्रभावती :** ही असली आडून बोलणीं नको आहेत मला. काय बोलायचं तें स्पष्ट बोला कीं. तुम्हांला पूर्वीसारखं नीट सुखानं राहयचंय् कीं नाहीं ?

**प्रभाकर :** नाहीं कोण म्हणतो ?–नाहींतरी ह्या भांडणाचा मला अगदीं वीट आलेला आहे. सुखानं राह्यचं असेल तर एकच मार्ग आपल्यापुढं आहे. –आणि तो म्हणजे आपण दोघांनीं उदारमतवादी. व्हायचं् आपण दोघांनीही आजपासून असं ठरवूंया कीं, दोघांनींही एकमेकांच्या भानगडींत पडायचं नाहीं. तसं झालं कीं, आपल्यावर हें आतांच्यासारखे भांडणाचे प्रसंगही येणार नाहींत, आणि मनःस्तापही होणार नाहींत. नवराबायकोचं नातं मात्र कायम ठेवायचं.

**प्रभावती :** [ संतापून ] स्वतःच्या दुष्कृत्यांवर उदार मताचं पांघरूण घालायचं आहे तुम्हांला ?–आणि या गोष्टीला माझी कबुली विचारतां ? कांहींच कसं वाटत नाहीं तुम्हांला असं विचारतानां ? मन मानेल तसं वागायला मिळावं, तुमच्या स्वैर वागण्यांत माझा अडथळा येऊं नये, म्हणून माझ्या बाबतींत लक्ष न घालण्याचा उदारपणा दाखवितां आहांत ! तुमच्या असल्या म्हणण्याला मी कबुली देईन, असं कसं वाटलं तुम्हांला ?

**प्रभाकर :** कां ? काय हरकत आहे ?

**प्रभावती :** तुम्हांला नसेल कशाची हरकत !—पण मी तुमच्याइतकी बनलें नाहीं अजून. नोकरी करणाऱ्या सर्वच स्त्रिया तुमच्या त्या मैनेप्रमाणं असतात असं वाटलं कीं काय तुम्हांला ?

**प्रभाकर :** पण बनण्या न बनण्याचा प्रश्न येतोच आहे कुठं ? नवराबायकोचं नीट पटावं असं असेल तर कुणीतरी एकानं पड खाऊन, एकमतानं वागलं पाहिजे. आपल्या दोघांपैकीं पड खायला कोणीच तयार नाहीं; त्यामुळं आपलं दोघाचं नीटपणें पटणं मुळींच शक्य नाहीं., मग एकमेकांच्या बाबतींत लक्ष घालून, भांडणं आणि संताप करून घेण्यापेक्षां मी म्हणतों त्याप्रमाणं आपसांत समझोता करून वागणं चांगलं नाहीं का ? त्याकरतां हा एक उपाय मीं सुचविला आहे इतकंच.

**प्रभावती :** तुमचं असं स्वैर वागणं मी उघड्या डोळ्यांनीं कधींच सहन करणार नाहीं. शक्यच व्हायचं नाहीं मला तें ! माझ्या बाबतींत लक्ष न घालण्याचा तुमच्या धोरणाची मला मुळींच जरूर नाहीं.–आणि तुम्हांलाही वाटेल तसं वागायला मी मोकळं सोडणार नाहीं.

**प्रभाकर :** मर्जी तुझी !—पण मी एकदांच सांगून ठेवतों, माझ्या कोणत्याही बाबतींत तूं लक्ष घातलेलं मला मुळींच खपायचं नाहीं. यापुढं मला तुझा कोणत्याही प्रकारचा अडथळा होतां उपयोगाचा नाहीं.

**प्रभावती :** शक्य नाहीं. कोणती बायको आपल्या नवऱ्याचा स्वैराचार उघड्या डोळ्यांनीं सहन करील ?

**प्रभाकर :** उघड्या डोळ्यांनीं पाहवत नसेल तर तिकडे डोळेझांक करावी.

**प्रभावती :** मी जर तुमच्यासारखी वागायला लागलें तर तुम्ही कराल कां तिकडे डोळेझांक ?

**प्रभाकर :** जें स्वातंत्र्य मला पाहिजे, तें तुला मिळूं नये असं म्हणणारा मी कांहीं जुन्या काळचा नवरा नाहीं.

**प्रभावती :** काय ? काय बोलतां तुम्ही हें ?

**प्रभाकर :** लग्न हा एक करार आहे. परिस्थितीप्रमाणें कराराच्या अटीही बदलायच्या असतात.

**प्रभावती :** आतां मात्र हद्द झाली तुमच्यापुढं ! स्वतःला स्वैर वागतां यावं म्हणून मला तशी सवलत देतां आहांत तुम्ही ?–पण किती झालं तरी मी एक कुलीन विवाहित स्त्री आहें; हिंदू आहें; माझ्या मनावर झालेले संस्कार

आणि नीतिअनीतींच्या कल्पना, तुमच्या सवलतींचा फायदा मला कधींही घेऊन देणार नाहींत. [प्रभाकर खांदे उडवतो व तोंडानें 'मर्जी तुझी' असें म्हणतो]– आणि तुम्हांलाही मी वाटेल तसं वागूं देणार नाहीं. यापुढं तुम्ही असं स्वैरपणानं वागलेलं मला बिलकुल खपायचं नाहीं. आजपासून हे प्रकार बंद झाले पाहिजेत.

**प्रभाकर :** आतां माझ्या वागण्याला तूं कोणत्याही प्रकारें प्रतिबंध करूं शकत नाहींस. पुन्हां तुला बजावून सांगतों. माझ्या कोणत्याही बाबतींत ढवळाढवळ केलेली मला खपायची नाहीं.

**प्रभावती :** इतके बेफाम झालां आहांत तुम्हीं ? स्वतःच्या बेतालपणाला आमचा अडथळा होऊं नये म्हणून मधूला दूर ढकललंत; आणि आतां मला दूर करण्याचा विचार आहे तुमचा ? माझी अडचण यापुढं तुम्हांला होणार नाहीं. देवानंच जर देवपण सोडून दिलं; त्यालाच जर फुलांच्या पूजेपेक्षां खेटरांची पूजा आवडायला लागली तर इतरांनीं तरी त्याला देव मानून उपयोग काय ? [निश्चयानें] आत्तांच्या आत्तां हें घर सोडून निघून जाणार आहें मी. [रागानें उजव्या हाताच्या खोलींत जाते. प्रभाकर पुनश्च 'मर्जी तुझी' असें म्हणत खांदे उडवून हात पसरतो व डाव्या हाताच्या दरवाज्यानें बाहेर जातो. स्टेजवर थोडावेळ कोणीच नसते. जवळच कोणीतरी गात असलेले करुणगीत ऐकूं येत आहे. एक मनुष्य आपलें घर सोडून जात आहे; त्यावेळची त्याची स्थिति त्या गाण्यांत वर्णन केली आहे. प्रभावती उजव्या हाताच्या दरवाज्यानें बाहेर येते. तिच्या हातांत एक बॅग आहे; डाव्या हातांत छत्री व मनीबॅग तिचीही स्थिति गाण्यांत वर्णन केल्याप्रमाणें झाली आहे. घर सोडतांना तिला ज्या यातना होत आहेत त्या गाण्याप्रमाणेंच तिच्या मुद्रेवरही प्रतिबिंबित झाल्या आहेत. ती आपले अश्रु पुसते; आणि निश्चयी चेहरा करून डाव्या हाताच्या दरवाजाकडे जाते. दारांतच उभी राहून ती आंत सर्व ठिकाणीं नजर फिरवते. भिंतीवर एक तसबीर वांकडी झालेली असते, ती तिच्या नजरेस पडते. पुन्हां आंत येऊन ती ती सारखी करते. डाव्या हाताच्या दरवाज्यांत कमल येऊन उभी राहते व प्रभावतीची स्थिति पाहते. गाणें संपतें. प्रभावती बॅग उचलून व

पुन्हां एकदां सर्व दिवाणखान्याभर नजर फिरवून डाव्या हाताच्या दरवाज्याकडे जाते. दरवाज्यांत तिला कमल दिसते. प्रभावती विस्मित होते व नंतर चिडते.)

**प्रभावती :** ये कमल. मी जाण्याची वाट पहात खालीं उभी होतीस वाटतं. निघालेंच आहें मी. घराचा ताबा घ्यायचाय ना तुला ?

**कमल :** मी इथं आलेली तुला आवडणार नाहीं, हें माहीत असूनसुद्धां मी मुद्दाम आलें आहें —

**प्रभावती :** किती उपकार आहेत तुझे माझ्यावर ! माझ्या घराची काळजी करण्याचं मला आतां कारण नाहीं.

**कमल :** [ तिच्या टोंचून बोलण्याकडे दुर्लक्ष करून ] तूं म्हणतेस त्याप्रमाणं तुझ्या घराचा ताबा घेण्यासाटीं नव्हें तर तुझा संसार सुरळीत चालू रहावा म्हणून आलें आहें मी.

**प्रभावती :** तुझा प्रवेश या घरांत झाला त्याच वेळीं माझ्या घराला आग लागली. प्रथम दुसऱ्याच्या घराला आग लागावयाची आणि पुन्हां ती विझवायला येण्याचा उदारपणा दाखवायचा ! त्यापेक्षां घराला आगच न लावली तर ?

**कमल :** तुझ्या घराला आग कोणीही लाविलेली असो, पण ती विझवण्याचा प्रयत्न करणें हें माझं कर्तव्य आहे.

**प्रभावती :** आणि करून संवरून वर पुन्हां निरपराधी माणसांचा आव आणणं हेंही तुझ्या अनेक कर्तव्यांपैकीं एक आहे वाटतं ?

**कमल :** माझ्याविषयींचें तुझें गैरसमज दूर करण्याचा मी मुळींच प्रयत्न करणार नाहीं. तर—

**प्रभावती :** कारण तसं करायला तुला तोंड नाहीं हें माहींत आहे तुला.

**कमल :** चूक आहे समजूत तुझी. माझ्याविषयीं बोलायला तोंड नाहीं असं नाहीं. लोकांनाच सरळ दृष्टी नाहीं—

**प्रभावती :** तुझ्या वांकड्या वागण्याकडे लोकांनीं सरळ दृष्टीनं पहावं अशी तुझी अपेक्षा आहे वाटतं ?

**कमल :** मी पत्करलेला मार्ग लोकांना वांकडा दिसत असला तरी सरळ आणि एकमार्गी आहे. सुख झालं तरी मला एकटीलाच होईल. दुःख झालं

तरी मी एकटीच दुःखी होईन. दुसऱ्या कुणाच्याही मार्गांना माझा मार्ग आडवा येत नाहीं.

**प्रभावती :** त्याच्या मार्गालासुद्धां ?

**कमल :** [ठांसून] होय प्रभाकरांच्या मार्गालासुद्धां.

**प्रभावती :** तसं असतं तर मला घराच्या बाहेर पाऊल टाकायचं कारण पडलं नसतं.

**कमल :** [तिरस्कारानें] घर सोडणं ! घर सोडणं !! आजपर्यंत अनेक स्त्रियांनीं आपापलीं घरं सोडून बाहेर पडल्याचं मी नाटककादंबऱ्यांतून वाचलं आहे. घर सोडणं म्हणजे केळीचं उष्टं पान फेंकून देण्याइतकं सोपं आहे ?

**प्रभावती :** सोपं ! मी म्हणतें स्वतःचं घर आणि संसार सोडून जाण्याइतकी कठीण गोष्ट जगांत दुसरी कोणतीही नसेल. विवाहित स्त्रीचें घर म्हणजे पंचप्राण आहेत. आपलं घर सोडून जाणं, म्हणजे एक भयंकर संकट आहे. इथल्या प्रत्येक वस्तूमध्यें अशी एकेक गोड आठवण सांठविली आहे कीं, त्या वस्तूच्या नुसत्या दर्शनानं अंतःकरणांत सुखाच्या लहरी निर्माण व्हाव्यात. घराच्या ह्या चार भिंतींत विवाहित स्त्रीचा सुखाचा खजिनाच असतो.

**कमल :** घराविषयीं इतकी आपुलकी अजूनही वाटतें तुला ? [स्वतःशींच संतुष्ट होऊन हांसते.]

**प्रभावती :** तुझ्यासारख्या सत्रा घरं असलेल्या पण स्वतःचं असं एकही घर नसलेल्या स्त्रीला काय कल्पना असणार ?

**कमल :** असं असूनसुद्धां तूं हें घर सोडायला तयार झालीस ?

**प्रभावती :** मला तयार व्हावं लागलं.–त्यांनीं भाग पाडलं;–तुझ्यामुळं मला माझं घर सोडावं लागत आहे.

**कमल :** अगदीं चुकीची आहे समजूत तुझी, प्रभा. तुझी नोकरीच या सर्वाला कारण आहे.

**प्रभावती :** तुझ्या म्हणण्याचा आशय माझ्या ध्यानांत आला आहे. मीं नोकरी सोडून द्यावी आणि पुन्हां पूर्वीप्रमाणें संसार करावा, असंचना ?

**कमल :** होय प्रभाकरांनाही असंच वाटतं ?

**प्रभावती :** म्हणजे ? त्यांनीं माझं मन वळवायला पाठवलं आहे तुला ?

**कमल :** असंच कांहीं मला म्हणतां येणार नाहीं. तूं जर तसं केलंस तर त्यांना हवंच आहे.–पण मीच स्वतः होऊन तुझं मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहतें आहें. मघांशीं मी इथून गेलें, त्यावेळीं तूं खूप रागावली होतीस. त्यांचं आणि तुझं भांडण होणार हें मीं जाणलं आणि मुद्दामच खालीं उभी राह्यलें. माझ्या अपेक्षेप्रमाणं झालं–अत्यंत उदास मनानं प्रभाकर बाहेर आले. त्यांना मीं समजावलं आणि तुझं मन वळविण्याचा शेवटचा प्रयत्न करावा म्हणून मी इथं आलें.

**प्रभावती :** स्वतः नोकरी करणाऱ्या स्त्रीनं, नोकरी करणाऱ्या दुसऱ्या स्त्रीला ती सोडण्याचा उपदेश करावा हें विचित्रच नव्हे का ?

**कमल :** तुझ्यामाझ्यामध्यें केवढा फरक आहे हें विसरते आहेस प्रभा, तूं. माझ्या मताप्रमाणें वागायला मी स्वतंत्र आहें. तुझं तसं नाहीं. केवळ स्वतःच्या मतानं तुला वागतां येणार नाहीं.

**प्रभावती :** पण मी नोकरी करूं नये असा त्यांचा आग्रह कां ? लग्न झालेल्या बायका नोकरी करीत नाहींत असं थोडंच आहे.

**कमल :** खरं आहे तुझं म्हणणं. प्रसंग पडला तर नुसत्या लग्न झालेल्याच नव्हे तर, चार मुलं झालेल्या स्त्रियांनांही नोकरी करणं भाग आहे. तुझ्यावर प्रसंग होता तेव्हां मीच तुला नोकरीला प्रवृत्त केलं होतं. आजही तूं नोकरी केलीस तरी माझ्या दृष्टीनं फारसं कांहीं बिघडतं आहे असंही मला म्हणतां येणार नाहीं. परंतु प्रभाकरांच्या दृष्टीनें पाहिलं तर तूं नोकरी करूं नयेस असंच मला वाटतं. तुझं लग्न झालं त्यावेळीं तुला नोकरी नव्हती. लग्न झाल्यावर तूं स्वतः संसारांत रमलीस आणि प्रभाकरांनाही रमवून सुखाचं असं विशिष्ट वातावरण तूं निर्माण केलंस. त्या वातावरणाशीं प्रभाकर पूर्ण समरस झाले; तें वातावरण तुझ्या नोकरीमुळें नाहींसं झालं; आणि रम्य उपवनांतून वाळवंटांत नेऊन सोडावं, त्याप्रमाणं प्रभाकरांची स्थिति झाली. साहजिकच त्यांचं मन संसाराविषयीं उदास झालं—

**प्रभावती :** आणि ते तुझ्या नादीं लागले असंचना ? स्वतःच्या सुखाकरतां तूं त्यांना आपल्या नादीं लावलंस, आणि त्याचा दोष माझ्या कपाळीं मारण्याची तुझी ही खटपट आहे हें न कळण्याइतकी मी मूर्ख नाहीं.

**कमल :** मीं तसं केलं असतं तर त्यांत गैर असं कांहींच नव्हतं. मीही मनुष्यच आहें आणि मलाही सुख हवं आहे. परंतु दुसऱ्या एका स्त्रीच्या-निदान माझ्या बालमैत्रिणीच्या सुखावर निखारे ठेवून मिळणारं सुख मला मुळींच नको आहे. माझ्या ठिकाणीं दुसरी एखादी स्त्री असती तर;-स्वतः नोकरी करण्यांत केवढा मोठा धोका आहे याची कल्पना तुला झाल्या प्रकारावरून करतां येईल.-आणि तो धोका पत्करूनही तुला नोकरी करायची असेल तर प्रभाकरांना सर्वस्वीं आपल्या आधीन ठेवण्याची इच्छा तुला सोडली पाहिजे. आहे तुझी त्याला तयारी ?

**प्रभावती :** मुळींच नाहीं. तुला विचारायचं तरी कसं ?

**कमल :** प्रभा, तुझ्या भावनाची पुरी कल्पना मला असल्यामुळं तुला परत संसारांत आणण्यासाठीं मी खटपट करीत आहे. पाश्चात्य शिक्षणानं आपण पाश्चात्यांचं अनुकरण करूं लागलों खरं; पण आपलीं मनं मात्र अजून नवीन आचारविचारांना तयार झाली नाहींत. आपल्या संस्कारांचा, नीतिअनीतीच्या कल्पनांचा पगडा अजून आपल्या मनांवर थोड्याफार प्रमाणांत कायम आहे. एखाद्या पाश्चात्य नाटकांतील भूमिकेप्रमाणें बॅग घेऊन घर सोडायला तूं तयार झालीस; पण संसार हेंच स्त्रीचं सर्वस्व आहे ही लहानपणापासून मिळालेली शिकवण तुझं मन विसरूं शकलं नाहीं. आपल्या मताकरतां आणि स्वातंत्र्याकरतां एखाद्या स्त्रीनं घर सोडून जाणं ही कल्पना कितीही उदात्त असली तरी तुझ्या संस्कारप्रीय मनाला ती कल्पना प्रत्यक्ष अंमलांत आणणं आज तरी जड गेलं. बाह्य परिस्थिति झपाट्यानं बदलली तरी मनावरील संस्कार पुसून जायला फार वेळ लागतो. ( थोडा वेळ दोघीही स्तब्ध बसतात. आपल्या बोलण्याचा परिणाम प्रभावतीवर होत आहे हें लक्षांत घेऊन कमल हंसते. ) प्रभा. प्रभाकरांच्यावर तुझं फार प्रेम आहे, नाहीं ?

**प्रभावती :** हें तूं मला विचारतेस ? मला माहीत आहे तूं मला खिजवते आहेस,–पण त्यांच्यावरील माझ्या प्रेमाचं तुझ्यापुढें कितीही वर्णन केलं तरी त्याची कल्पनाही तुला होणार नाहीं.

**कमल :** अजूनही तुझं इतकं प्रेम आहे, प्रभाकरांवर ?

**प्रभावती :** अजूनही ? माझं प्रेम कांहीं भाडोत्री प्रेम नाहीं तात्पुरतं टिकायला ! इथल्या प्रत्येक वस्तूला विचार, त्यांच्यावरील माझ्या प्रेमाची उत्कटता ती तुला समजावून सांगेल.

**कमल :** किती प्रेम आहे तुझं प्रभाकरांवर, प्रभा ! [ थोडं थांबून ] –पण प्रेमाची खरी कसोटी त्यागानंच होत असते.

**प्रभावती :** हें शिकवायला नको आहे मला. गेलीं आठ वर्षें आम्हीं सुखासमाधानानं काढलीं तीं काय उगीच ?

**कमल :** क्षुल्लक आवडीनिवडी आणि बारिकसारिक तत्त्वं दुसऱ्यासाठीं सोडणं म्हणजे कांहीं त्याग नव्हे. प्रेम पूर्णपणें कसोटीला उतरेल असा खऱ्या त्यागाचा प्रसंग सबंध आयुष्यांत एकदांच येत असतो.

**प्रभावती :** केवळ ते मला सुख देतात म्हणून मी त्यांच्यावर प्रेम करीत नाहीं ! त्यांच्या सुखासाठीं मी त्याग करणार नाहीं असं वाटलं तुला ?

**कमल :** तुझ्या प्रेमाची खरी कसोटी होईल अशी त्यागाची वेळ या क्षणापर्यंत तुझ्यावर कधींच आली नाहीं, प्रभा ? [ प्रभावतीचा चेहरा एकदम उतरतो. ती चमकून कमलकडे बघते. ] या क्षणाला तशी वेळ आली आहे. [ थोडा वेळ थांबून ] मी काय म्हणतें तें तुझ्या लक्षांत आलं असेलच.

( कांहींतरी नवीन प्रकाश दिसल्यासारखें करून प्रभावती शून्य नजरेनें समोर पहात राहते. कमल हळूच निघून जाते. प्रभावतीचें तिकडे लक्षही जात नाहीं. थोड्या वेळानें ती एक लांब सुस्कारा टाकते; व आजूबाजूला पाहते. कमल निघून गेल्याचें तिच्या लक्षांत येतें. ती तशीच दरवाज्यापाशीं तिला हांक मारण्याच्या उद्देशानें जाते. पण बाहेर डोकावून पाहून ती परत घाईघाईनें आंत येते. क्षणभर पुन्हां विचारांत पडते. परंतु कांहींतरी निश्चय करून ती बॅग, मनीबॅग व छत्री उचलते व उजव्या बाजूच्या दरवाज्यानें लगबगीनें आंत जाते,

व त्या जिनसा ठेवून बाहेर येते. दरवाज्याबाहेर ती यायला आणि डाव्या हाताच्या दरवाज्यानें प्रभाकर आंत यायला एक गांठ पडते. दोघंही दरवाज्यांतच एकमेकांकडे पाहत उभी राहतात. नंतर हळूहळू दोघंही पुढं येतात. दोघांनाही कांहींतरी बोलायचं आहे; पण काय आणि कसं बोलावं हेंच त्यांना समजत नाहीं. शेवटीं प्रभावती धीर करून बोलते. तिची मुद्रा ओशाळलेली पण शांत आहे. )

**प्रभावती :** चहा घ्यायचा आहे ? करतें हवा तर.

**प्रभाकर :** वा ! जरूर. यावेळीं चहाची अत्यंत जरूर आहे मला.

**प्रभावती :** आत्तां आणतें हं करून. ( त्याच्याकडे बघून हंसते. प्रभाकरही हंसतो, आणि त्याचवेळीं शरद-मंदा दरवाज्यांत येतात. प्रभावती आंत जाते. शरद-मंदा एकमेकांकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहतात. )

**मन्दा० :** दादा-[ प्रभाकर मागें वळून पाहतो. ]

**शरद :** [त्याच्या पाठीवर थाप मारून] कायरे, खूप आनंदांत दिसतोयस ?

**प्रभाकर :** हो, आहे खरं असं ! मंदा, तुझी वहिनी आंत चहा करीत आहे. दोन कप चहा जास्त टाकायला सांग पाहूं.

**मन्दा० :** मेव्हण्यांचं कांहीं हितगुज चालायचं आहे वाटतं ?

**प्रभाकर :** होय. बायकांना घरांत कोंडून कसं ठेवायचं याचा विचार करणार आहोंत आम्ही.

**मन्दा० :** [ एकदम गंभीर होऊन ] शक्य नाहीं व्हायचं तुम्हांला तें- आजची परिस्थितीच अशी आहे. [ आंत जाते. ]

**प्रभाकर :** काय रे शरद. ही अशी एकदम कडवटपणानं कां बोलली ? तिला राग येण्यासारखं तर मी कांहींच बोललों नाहीं.

**शरद :** [घाईनें] जाऊं दे रे-पण आधीं तूं मला सांग, एखादी यक्षिणीची कांडी तुला सांपडली कीं काय ?

**प्रभाकर :** खुद्द यक्षीणच भेटली म्हण ना ?

**शरद :** कोणती ?

**प्रभाकर :** तिचं नांव कमल. आमच्या ऑफिसमध्येंच आहे ती.

**शरद्** : अस्सं ! ऐकून माहीत आहे मला ती बाई. तुझं अन् तिचं खूपच सख्य आहे हेंही ठाऊक आहे मला.

**प्रभाकर** : कुणी ? प्रभानं सांगितलं वाटतं तुला ?

**शरद्** : वहिनींनीं जरी सांगितलं नसतं तरी अशा गोष्टी कांहीं लपून राहात नाहींत.

**प्रभाकर** : अशा म्हणजे कशा रे शरद ?

**शरद्** : माझ्यापेक्षां तुलाच ठाऊक आहेत कशा त्या.

**प्रभाकर** : [ हंसून ] असं होय ? पाश्चात्यांच्या अनुकरणानं आपल्या बाह्य स्वरूपांत खूप फरक पडलाय; पण मनानं मात्र आपण अजून पूर्वीच्याच अवस्थेंत आहोंत असं कमल म्हणते, तें कांहीं खोटं नाहीं.

**शरद्** : कमल म्हणजे भगवद्गीता नव्हे तिचा आधार घ्यायला !

**प्रभाकर** : बदललेल्या परिस्थितीप्रमाणें आधारही बदलले पाहिजेत. पूर्वीच्या काळीं उपयोगी पडणारे आधार आजच्या काळांत कसे उपयोगी पडतील ?

**शरद्** : तिच्याविषयीं तुला फार आदर वाटतो तर ?

**प्रभाकर** : कां वाटूं नये ? माझा विस्कटलेला संसार तिनं परत नीट मांडून दिला; एवढंच नव्हे तर, नैतिक दृष्ट्या माझा तोल जात असतां तिनं मला सांवरून धरलं.

**शरद्** : म्हणजे तिचा आणि तुझा संबंध—

**प्रभाकर** : लोकांना वाटतो त्याहून अगदीं निराळा आहे. याचं सर्व श्रेय मात्र मी तिलाच देतों. तिच्याऐवजीं दुसरी एखादी, फक्त स्वतःच्याच सुखाकडे पाहणारी स्त्री असती तर या परिस्थितीचा फायदा तिनं चटकन् घेतला असता. कमलनें तो घेतला असता तर तें साहजिकच होतं. तीही मनुष्यच आहे. पण तिनं तसं केलं नाहीं. दुसऱ्याच्या सुखाची राखरांगोळी करून स्वतः सुख घ्यायचा तिचा स्वभावच नाहीं.

**शरद्** : मग अशा स्त्रीच्या सहवासांत तूं सांपडलास हें तुझं भाग्यच नव्हे का ?

**प्रभाकर :** निःसंशय. तिच्यामुळेंच तर माझा अधःपात टळला. आणि पुन्हां, मला हवं असलेलं सुख परत मिळालं.

**शरद :** पण हें सर्व तिनं घडवून तरी कसं आणलन् ? खरं सांगूं तुला प्रभाकर, मंदाची आणि माझीही अशी समजूत झाली होती, की, तुमच्या दोघांच्याही ' केसेस ' अगदीं ' होपलेस ' आहेत म्हणून.

**प्रभाकर :** आज नाहीं उद्यां माझ्या संसाराचं बस्तान पुन्हां नीट बसेल अशी कमलनं खात्री करून दिली; एवढंच नव्हे तर तें तसं नीट बसवून देण्याची कामगिरी तिनं स्वतःच्या आंगावर घेतली. तिनं ती कामगिरी किती यशस्वी रीतीनें पार पाडली आहे हें आपल्याला आतां दिसतंच आहे.–पण हें सर्व तिनं कसं घडवून आणलं हें मात्र तिचं तिलाच माहीत.

**शरद :** आपल्याला तें माहीत नसलं तर कांहीं अडत नाहीं त्यावांचून ! ( हातांत चहाचा ट्रे घतलेली प्रभावती व मंदा येतात. प्रभावती चहा तयार करून कप भरूं लागते. )

**प्रभावती :** [ प्रभाकरास ] तुमच्या चहांत जास्त साखर टाकूं ना ?

**प्रभाकर :** तर ! मला चहांत जास्त साखर लागते हें ठाऊकच आहे तुला.

**शरद :** वहिनी, आपल्याला कमीच पाहिजे हं. हे लोक एवढा गोड चहा कसा पितात कुणास ठाऊक !

**प्रभाकर :** जसा स्वभाव तशी आवड ! गोड स्वभावाच्या माणसांना गोडच चहा आवडायचा.

**मन्दा० :** खरं आहे. पण दुसऱ्याला लागेल असं कडू बोलण्यांत काय गोडी आहे हें नाहीं समजलं मला. गोड चहा न पिणाऱ्यांना वाईट स्वभावाचे ठरवलेंस कीं चटकन्.

**प्रभाकर :** वा ! ग्रँड ! वकिलीणबाई शोभतेस खरी. उत्तराला प्रत्युत्तर करण्यांत एखाद्या वकिलालाही हार नाहीं जाणार तूं.

**शरद :** खरं आहे. ( दोघेही हंसतात. )

**मन्दा :** ( उसन्या रागानें ) काय खरं आहे ?

**प्रभाकर :** पण तुला राग येण्यासारखं काय बोललों आम्ही ? उलट तूं वादविवादांत कुशल आहेस असंच मी म्हणत होतों.

**प्रभावती :** हें पहा मंदा, राग आला असेल तर चहाच्या घोटाबरोबर गिळून टाक तो. "उष्णं उष्णेन शाम्यते" ( प्रभाकर-प्रभावती हंसतात. शरद-मंदा उगीच हंसल्यासारखं करतात. सर्व चहा घेतात. )

**प्रभाकर :** काय रे शरद; -आणि तूं मंदा, आज तुम्ही इकडे कुठं ? वास्तविक पाह्यला गेलं तर यावेळी कुठल्यातरी बागेंत एखाद्या आडोशाच्या ठिकाणीं, नाहींतर शहराबाहेर नदीकांठीं गुलगुल गोष्टी करीत बसलेली असायचीत् तुम्ही—

**मन्दा :** ( प्रभाकराच्या थट्टेमुळें हिची कळी उमलत नाहीं. ती गंभीरच असते ) दादा—

**प्रभाकर :** गप्प बस. माहीत आहे मला तूं काय बोलणार आहेस तें. इतक्या दिवसांत आज तुम्हांला आमची आठवण होत आहे.

**प्रभावती :** तर काय ? इतके दिवस आपली अशी दुसरी माणसं आहेत याची जाणीव झाली होती का मनाला ? अगदीं आपल्या माणसांना विसरण्या-इतके संसारांत गढून गेला आहांत कीं काय ?

**शरद :** हें बघ प्रभाकर, ही थट्टा निदान या वेळीं तरी नको आहे.

**प्रभाकर :** म्हणजे! मी बोलतों आहें ही थट्टा समजलास कीं काय तूं ? मी अगदीं अंतःकरणापासून बोलतों आहें. तुमचा दोघांचा मला खूप राग आला आहे. अरे, तुम्हीं संसार मांडण्याला तीन महिने झाले; एकदां तरी आम्हांला जेवायला बोलवायचं होतंत.

**प्रभावती :** आपल्याला त्यांच्याकडे जेवायला जायचा इतक्यांत अधिकार नाहीं बरं का.

**प्रभाकर :** म्हणजे ? मंदेच्या संसारांत आपला कांहींच भाग नाहीं का ?

**प्रभावती :** आहे;—पण तो एवढ्यांत नाहीं. तुम्हांला माहीत नाहीं ? मंदेचं कन्यादान आपण केलें आहे. तिच्या संसारांत तिसरं मनुष्य आल्याशिवाय आपल्याला तिच्याकडे जेवतां यायचं नाहीं. पद्धतच आहे तशी !

**प्रभाकर** : अस्सं होय ? काय मंदे, किती दिवस वाट पाहत बसावं लागणार आहे आम्हांला ?

**शरद** : हें पहा प्रभाकर, आपण केलेली थट्टा सहन करण्याच्या मनःस्थितींत दुसरं मनुष्य आहे कीं नाहीं, हें थट्टा करणारानें प्रथम पाहिलें पाहिजे.

**प्रभाकर** : अकालीं गंभीर बनलेल्या तरुणांनो, तुम्ही चुकता आहांत. तुमचं सध्यांचं वय हें शक्य तितकें खेळकर बनण्याचं आहे.

**शरद** : खेळकर बनायला तरुण वयाशिवाय परिस्थितीही अनुकूल असावी लागते.

**प्रभावती** : खरंच. थट्टा पुरे आतां. आल्यापासून शरद अन् मंदा दोघंही गंभीर आहेत. आज त्यांचं कांहींतरी बिनसलं आहे.

**प्रभाकर** : ठीक आहे. बहुमताला मान देणं आजच्या काळाला धरूनच आहे. तेव्हां थट्टा न करतां मी गंभीरपणें विचारतों. [ गंभीर झाल्याची बतावणी करीत ] शरद आणि मंदा, असं काय घडून आलं आहे कीं, ज्यामुळं तुमचीं अंतःकरणं व्यथित व्हावीत ? कोणत्या कारणास्तव सांप्रत तुम्हांला गांभीर्य धारण करणं प्राप्त झालं आहे ? कोणत्या चिंतेचा भृंग तुमच्या मनाला पोंखरून काढीत आहे—?

**शरद** : प्रभाकर, तुझी थट्टा थांबणार आहे कीं नाहीं ?

**प्रभाकर** : थांब. बोलूं नकोस मधें. ( आठवल्यासारखं करून ) हं. सांपडलं कारण ! हें पहा. मी इथं एक छोटसं प्रात्यक्षिकच करून दाखवतों. [ टेबलावरचा एक कप उचलून ] हं. हा शरद; हा इथं बसलेला आहे. [ बशी कपासमोर ठेवीत ] ही मंदा, त्याच्यासमोर उभी आहे. दोघंही विचार करीत आहेत, कीं आज बाजारांतून ताजं अळू आणलेलं आहे. त्याची सुरेखशी पातळ भाजी करायची, कीं खमंग अळूवड्या बनवायच्या ? केवढा गहन प्रश्न हा ! ( मोठ्यानें हंसतो. प्रभावतीही हंसते. )

**मन्दा** : दादा. तुझी थट्टा थांबवतोस, कीं—

**प्रभाकर** : थांब—पुढले शब्द बोलूं नकोस. कारण ते खोटे ठरतील. आज मला इतका आनंद झालाय् कीं, तो या घटकेला तरी कोणालाही हिरावून घेतां

येणार नाहीं. [ प्रभाकर बोलत असतां कमल दरवाज्यांत येऊन उभी राहते. तिच्या कानीं वरील वाक्य पडतें. ]

**कमल :** आनंदाच्या भरांत एक गोष्ट विसरलांत तुम्ही ! [ सर्व तिच्याकडे पाहतात. ]

**प्रभावती :** [ आश्चर्यानें ] कमल !—

**कमल :** [ प्रभावतीस ] येऊं का ग आंत ?

**प्रभावती :** [ तिच्याजवळ जाऊन ] चल्. वात्रटपणा नको करूंस. मला काय माहीत तूं इतकी नाटकी असशील असं ?

**प्रभाकर :** कमलाबाई, तुम्ही काय म्हणत होतात ?

**कमल :** हेंच कीं, आनंदाच्या भरांत एक गोष्ट विसरलांत.

**प्रभाकर :** [ कृतज्ञतेनें ] मुळींच नाहीं. कमलाबाई, तुम्हीं आमच्याकरतां–

**कमल :** अंहं. पुढं बोललेलं मला नाहीं खपायचं ! मी दुसऱ्याच गोष्टीबद्दल बोलत होतें.

**प्रभाकर :** काय विसरलों बुवा आम्ही ! काय ग प्रभा ?

**प्रभावती :** कांहीं आठवत नाहीं, बाई !

**कमल :** हेंच पहाना. तुम्हीं काय विसरलांत हें सुद्धां तुम्हांला आठवत नाहीं. थांबा हं [ बाहेर जाऊं लागते. प्रभावती तिच्या पाठोपाठ जाऊं लागते. ] अंहं. माझ्या मागें नाहीं यायचं. उभी रहा इथंच. [ जाते. सर्वजण दरवाज्याकडे उत्कंठेनें पाहतात. एक दोन मिनिटांत दारांतून मधुकर धांवत आंत येतो व "दादा" "आई" अशा हांका मारतो. ]

**प्रभावती :** मधू ! [ त्याला उचलून घेते. ]

**मधू :** आई, मावशीनं मला मोटारींतनं आणलं. मला सांगितलंन् कीं, तुला आतां आईजवळ राह्यचंय् म्हणून. होय आई ?

**प्रभावती :** तर ! आतां नाहीं कांहीं तुला परत पाठवायचं.

**प्रभाकर :** अरे, पण कमलाबाई कुठं आहेत ? [ दरवाज्याबाहेर डोकावून पाहतो व आंत येऊन ] गेल्या वाटतं त्या ?

**मधू :** हं. मोटारींत बसून गेली. मला म्हणाली कीं, खूप काम आहे.

**प्रभाकर :** काय विलक्षण बाई आहे !

**मन्दा :** दादा, आम्ही जातों बरं का ? [ शरदला ] चला, जाऊं या आपण आतां.

**प्रभाकर :** वा ! हें ठीक आहे. आतां एवढ्यांत सोडणार वाटतं आम्ही तुम्हांला ?

**प्रभावती :** जेवूनच जा मंदा, तुम्ही. यापुढं घरीं जाणार केव्हां आणि जेवायचं केव्हां करणार ?

**मन्दा :** तूं खूप आनंदांत आहेस; वहिनी आणि मधूही आनंदांत आहेत. अशा वेळीं आम्हीं यायला नको होतं. अगदीं अवेळीं आलों आम्ही !

**प्रभावती :** रागावलीस मंदा ? त्यांनीं मधाशीं थट्टा केली ती नको मनावर घेऊंस. [ प्रभाकरास ] तुम्ही नाहींतरी फारच करतां ! थट्टेला कांहीं सीमा आहे कीं नाहीं ? उगीच चिडवलंत मात्र तिला.

**प्रभाकर :** [ ओशाळून ] माफ कर हं मंदा—

**मन्दा० :** माफी कसली मागतोस दादा. आम्ही जर यापुढं इथं थांबलों तर तुमच्या आनंदावर विरजण पडेल. म्हणून—

**प्रभाकर :** माझ्या प्रिय माणसांच्या संगतींतच होणारा आनंद मला पाहिजे आहे. तुमच्या चेहऱ्यावरून आणि वागण्यावरून तुमचीं मनं आज ताळ्यावर नाहींत हें मी ओळखायला पाहिजे होतं. सांग पाहूं चटकन् काय झालं तें ?

**मन्दा० :** [ उसनें हंसून ] एवढं कांहीं घाबरायला नको आहे, दादा. तसं कांहीं विशेष नाहीं.

**प्रभावती :** उगीच हंसून गोड नको करूंस मंदा. असं काय ? सांग ना ?

**मन्दा० :** [ दुसरीकडे पाहत. ] नोकरी धरणार आहें मी उद्यांपासून.

**प्रभाकर :** } काय नोकरी ?
**प्रभावती :** } थट्टा तर करीत नाहींस, मंदा ?

**शरद :** थट्टा नव्हे. मंदा सांगते तें खरं आहे.

**प्रभाकर :** आणि त्याला तुझी संमति आहे ?

**शरद :** [ शुष्कपणानें हंसून ] तर ! संमति देणं भागच पडलं ना.

**प्रभाकर :** मला अतिशय आश्चर्य वाटतं या घटनेचं !

**प्रभावती :** मंदा, नोकरी करणार नव्हतीस ना तूं ?

**प्रभाकर :** शरद, मंदा, नोकरी करणं खरंच तुम्हांला आवडलं ?

**शरद :** हें पहा प्रभाकर, आपल्या मनाविरुद्ध कित्येक गोष्टी आपल्याला कराव्या लागतात ना ? त्यांतलीच ही एक आहे. [ सर्व कांहीं चेष्टेवारी नेण्याच्या उद्देशानं ] हें चाललंच आहे. अरे, पण तुम्ही सर्व असें भकास चेहरे करून टकमक पाहात काय बसलां आहांत ? आत्तां जर आपल्याला कुणीं पाह्यलं तर त्याला वाटेल, किती घोर संकटांत सांपडलों आहोंत आपण !

**प्रभाकर :** शरद, मंदा, तुमच्या दोघांच्या तोंडावरून तुम्ही मनाविरुद्ध वागत आहांत हें स्पष्ट दिसत आहे. काय अडलं आहे मंदानं नोकरी करण्यावांचून.

**शरद :** म्हणजे ? सगळंच अडलं आहे कीं.

**प्रभाकर :** कृपा करून जरा स्पष्ट बोलशील का ?

**शरद :** अरे, यांत कृपा कसली ? हें पहा, प्रभाकर, तुला माहीत आहे, मी अगदीं कफल्लक आहें. ना घर ना दार. चार पैसे मिळविण्याची अक्कल आहे; पण ती वापरायला वाव नाहीं. वकिलीची पाटी लावून बसलों; पण अशिलांनीं आमच्याकडे यायचं साफ नाकारलं. त्याला कोण काय करणार ? हजार उचापती करून, याची टोपी त्याला घालून, पैसे मिळविण्याची इच्छा नाहीं. थोडाफार पैसा आम्हीं दोघांनींही शिल्लक टाकलेला होता; त्यांतून संसार सजविला. शिवाय तीन महिने काढले त्या पैशावर. किती दिवस चालणार असं. तेव्हां सांगून टाकलं मंदाला नोकरी कर म्हणून;—आणि तिलाही जणूंकाय तिच्याच मनांतली गोष्ट बोललों असं वाटलं. [ कोणी कांहींतरी बोलेल म्हणून थोडावेळ थांबतो. मंदा आपली मनःस्थिति व भावना लपविण्यासाठीं मधूला पुस्तकांतील चित्रें दाखवीत आहे. प्रभावती-प्रभाकर काय बोलावं याचा विचार करीत आहेत. कोणी कांहींच बोलत नाहींसें पाहून ] बाकी, प्रभाकर तूं कांहीं

म्हण;–पण शिकलेली बायको करण्यांत फायदा आहे. आंगावर कसलीच जबाबदारी नको. ती नोकरीही करते आणि संसारही चालवते.

**प्रभाकर :** [ विचारांतून सुटल्यासारखें करून ] हें पहा शरद, वरून आनंदीपणाचं कितीही सोंग आणलंस, तरी मनाची व्यथा कांहीं तुला लपवितां येत नाहीं. हें पहा, या क्षणापासून तुमचा दोघांचा मुक्काम आमच्याकडे.

**शरद :** [ मान डोलवीत ] उत्तम ! म्हणजे आज बायकोच्या जिवावर जगणारा वकील म्हणून लोक ओळखतील; त्याप्रेक्षां उद्यां घरजांवई म्हणून ओळखलेलं वाईट नाहीं.

**मन्दा० :** [ पुढें येत ] दादा, तूं अन् शरद, कितीही वेळ बोलत राहिलांत तरी आहे ही स्थिति बदलणार आहे का ? त्यापेक्षां आल्या परिस्थितीला तोंड देऊन धैर्यानं आणि आहे त्या स्थितींत आनंद मानून, परिस्थिति बदलण्याचा प्रयत्न करीत राहणं हेंच योग्य नाहीं का ?

**प्रभाकर :** कारण तसं करण्यावांचून दुसरं आपल्या हातांत काय आहे ?

**शरद :** उत्तम–कबूल आहे आपल्याला. कारण मंदेच्या नोकरीचा प्रश्न सोडविणं आपल्याला शक्य नाहीं.

**प्रभावती :** खरं आहे. हा प्रश्नच अशा तऱ्हेचा आहे कीं, तो सोडविण्याचा प्रयत्न आपण न करणंच चांगलं. आजचं आपलं जीवन म्हणजे जुनें संस्कार आणि नवे विचार याचं **समरांगण** बनलेलं आहे.–आणि त्या दोघांपैकीं एकाचा–अर्थातच नवविचारांचा-पूर्ण विजय होईतों आपल्या इच्छा-आकांक्षांना आपल्याला मुकावं लागत आहे. मनाविरुद्ध आचरण करणं भाग पडत आहे. आज आपल्या-पुढं जे अनेक प्रश्न उभे राहातात, ते म्हणजे या समरांगणांतून अंशतः मुक्त तरी होण्याची धडपड आहे.–पण ती व्यर्थ आहे. नवविचारांच्या विजयानेंच हे प्रश्न आपोआप सुटणारे आहेत. आज तरी आपल्या मनावर होणारे विविध आघात धैर्यानं सहन करीत त्या विजयाची वाट पाहाणं आपल्याला भाग आहे.

(बोलत असतां प्रभावती चहाची उपकरणीं आवरीत असते. वरून ती शांतपणा दाखविण्याचा कितीही प्रयत्न करीत असली तरी तिला तें लपवितां येत नाहीं. विचारांचा प्रक्षोभ तिच्या मुखावर प्रतिबिंबित झालेला आहे. बोलणें संपल्यावर कोणाकडेही न पाहतां, चहाचा ट्रे उचलून ती आंत निघून जाते. मधुकर तिच्या मागोमाग जातो. नोकरी सोडण्यामागील प्रभावतीची खरी भूमिका प्रभाकराला आणि शरद-मंदाला समजून आल्यामुळें तिघेंही प्रभावतीकडे पाहत राहतात. प्रभावती आंत गेल्यावर प्रभाकर एकदम खुर्चीत तळहातांत मस्तक धरून बसतो.)

**प्रभाकर :** [थोड्या वेळानें वर बघत] म्हणजे, प्रभानं नोकरी सोडली ती मनापासून नव्हे !-त्यापेक्षां तिनं नोकरी सोडलीच नसती तर-!

**समाप्त**